# जन्माचे सोबती

[ स्वतंत्र कौटुंबिक नाटक ]

लेखक

व्यंकटेश शंकर वकील, बी. ए.

रुपया ] प्रदीप प्रकाशन [ मे १९४३

# मला असं सांगायचं आहे की—

हे एक कौटुंबिक नाटक असून, त्यांत जरी हयात व्यक्ती फोनवरून बोलत असल्या तरी त्यांतलीं चारही पात्र काल्पनिक आहेत.

एक चांगलसं नाटक लिहिण्याची इच्छा मला बऱ्याच दिवसांपासून सतावीत असली तरी नाटक मात्र याच मे महिन्याच्या १ ते ४, आणि १० ते १२ या तारखांच्या दरम्यान लिहिण्यांत आलं.

नाटक छापायच्या आधीं ज्या कांहीं माझ्या स्नेह्यांनीं तें वाचलं आणि मला सूचना केल्या त्यांचा मी आभारी आहे; चतुर नाट्यदिग्दर्शक श्री. प्रभाकर केशव गुप्ते, आणि चित्राचे संपादक डॉ. चिटणीस यांचा तर विशेषच !

जितक्या तांतडीनं नाटक लिहिण्यांत आलं तितक्याच तांतडीनं तें छापून काढण्यांत सहाय्य केल्याबद्दल राष्ट्रवैभव छापखान्याचा चालक वर्ग आणि कामगार वर्ग यांचा मी ऋणी आहे.



—व्यंकटेश वकील



प्रकाशक
**वामन विष्णु भट,**
भीमरावबाडी, मुंबई नं. २

**आवृत्ति पहिली**

मुद्रक
जयराम दिपाजी देसा
राष्ट्रवैभव प्रेस, गिरगांव, मुं

# त्रिकोणाचं विसर्जन

माझे मित्र श्री. व्यंकटेश वकील यांच्या स्वतंत्र नाट्यकृतीला प्रस्तावना लिहिण्याचं काम त्यांनीं माझ्यावर सोपवलं. परंतु ही जबाबदारी माझ्या हातून यशस्वी रीतीनं पार पडेल कीं नाहीं याची मला शंका वाटते. 'जन्माचे सोबती' हें वकीलांचं पहिलं वहिलं नाटक प्रसिद्ध होत असलं तरी यापूर्वी त्यानीं एक दोन मोठीं नाटकं लिहिलीं आहेत. त्यांच्या एकांकिका तर कितीतरी प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या सर्व एकांकिका मी वाचून काढल्या आहेत व त्या थोड्या बहुत प्रमाणांत मला आवडल्याही आहेत. परंतु प्रस्तुत नाटकांत त्यांच्या प्रतिभेचा जो एक नवीन आविष्कार दृष्टीस पडतो तो अनपेक्षित असल्यामुळं अधिकच अभिनंदनीय ठरतो. या नाटकाचा लेखनकाल ७–८ दिवसापेक्षां अधिक नाहीं हें लक्षांत घेतां वकीलानीं अगदीं सहज लीलेनं एक उत्कृष्ट कलाकृती निर्माण केली असं म्हटलं पाहिजे. या प्रतिभाशाली नाटककाराचा भविष्यकाळ उज्वल आहे याची खात्री मनाला पटते. योग्य दिशेकडून प्रोत्साहन मिळाल्यास श्री. वकील हे यापेक्षांही अधिक चांगलीं नाटकं लिहितील व मराठी रंगभूमीचा पुनरुद्धार करण्यास मदत करतील अशी आशा करावयास मुळींच हरकत नाहीं.

या नाटकाचं तंत्र अगदीं साधं असल्यामुळं तें रंगभूमीवर आणण्यास फारच सुलभ पडेल. मुंबई–दादर इथं राहणाऱ्या एका सुखवस्तु गृहस्थाच्या घरांतील दिवाणखान्यांत एकंदर कथानक घडलं, हें सजावटीच्या दृष्टीनं फारच सोईस्कर आहे. पात्रं सुद्धां अगदीं मोजकीं. चारच. दोन स्त्रिया, एक पुरुष आणि एक नऊ वर्षांचा मुलगा. कोणत्याही नाटकमंडळीला किंवा हौशी गटांना हें नाटक अगदीं थोड्या खर्चात करतां येण्यासारखं आहे. नाटकाची बैठक वास्तववादी आहे असं म्हटलं तर त्यांत नावीन्य असं कांहींच नाहीं. कारण महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व लेखक स्वतःला वास्तववादी समजतात. आपला वास्तववाद अधिक आकर्षक करण्याकरितां आपण त्यांत अद्भुतरम्यतेचे भडक रंग ओतीत असतो याची त्या बिचाऱ्यांना मुळींच जाणीव नसते. त्याचप्रमाणं एखादी गोष्ट खरोखर घडली असली तरी विशिष्ट कथानकाच्या अनुरोधानं ती अद्भुतरम्य भासते, याचा ते विचार

करीत नाहींत. म्हणूनच आधुनिक वास्तववादांत वास्तवता ही बहुतेक अभावानं तळपत असते. श्री. वकील यांच्या नाटकांतील वास्तवता इतकी प्रखर आहे कीं आपल्याला ती घरगुती वाटते. त्यांच्या कथानकाचा प्रारंभ आणि शेवट यांच्यामधला काल जरी आठ दिवसांपेक्षां अधिक नसला तरी या आठ दिवसांत त्या छोट्याशा दिवाणखान्यांत कितीतरी घडामोडी होतात. एका सुशिक्षित आणि समंजस गृहिणीचा संसारवृक्ष साफ करपून जायचा किंवा त्याला सतेज अशी नवी पालवी फुटायची ह्या अत्यंत जिव्हाळ्याच्या व हृदयाला हादरून सोडणाऱ्या प्रश्नाचा निकाल त्या आठ दिवसांत लागतो. हा प्रश्न बऱ्याच नाटककारांनी हाताळलेला आहे आणि त्यांनी या प्रश्नाचीं निरनिराळीं उत्तरं दिलीं आहेत. अगदीं अभिनव पद्धतीनं वकिलानीं हा प्रश्न हाताळला आहेच परंतु तो प्रश्न सोडवण्याची त्यांची रीतही अनपेक्षित अतएव चमत्कारीक अशी कांहीं लोकांना भासेल. खरोखर पाह्यलं तर या अनपेक्षितपणामुळंच या नाटकाला एक उत्कृष्ट कलाकृती ठरविण्याचा मला मोह होतो. साधारण वाचकांच्या दृष्टीनं नाटकाचा शेवट अनपेक्षित असला तरी तो तसा होणार आहे हें नाटककारानीं लहान सहान गोष्टींच्या द्वारें पहिल्या अंकापासूनच सूचित करून ठेवलें आहे. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगायचं म्हणजे या नाटकांत जी नैसर्गिक समतोलता (balance) मला आढळते ती दुसऱ्या अगदीं थोड्या नाट्यकृतींत मला आढळून आली आहे.

नाटकाचं कथानक एकाच स्थळी घडून आल्यामुळं या नाटकांत प्रसंग किंवा ज्याला आपण इंग्रजींत Situations म्हणतों ते या नाटकांत मुळींच नाहींत. कथानकाचा विकास प्रसंगाच्या द्वारें होत नसून तो संवादरूपानं परिणत होत गेला आहे. म्हणूनच या नाटकांतील उत्कर्षबिंदु संवादांतच आढळतो. हे संवाद लिहिण्यांत वकिलांची अभिजात कुशलता सहज दृष्टीस पडते. त्यांचे संवाद साधे– घरगुती म्हटले तरी चालेल– सुटसुटीत व कांहीं कांहीं ठिकाणीं अत्यंत मर्मभेदी असे झाले आहेत. तिसऱ्या अंकांतील कला व मीरा यांचा खटकेदार संवाद वाचकांनीं पुनः पुनः वाचावा. कांहीं ठिकाणीं तर हे संवाद इतके हृदयस्पर्शी झाले आहेत कीं ते वाचतांना वाचकांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहतील. संवाद हाच या नाटकाचा गाभा आणि तो गाभा इतक्या

हळुवार हातांनीं वकिलांनीं रचला आहे कीं त्यांतील प्रत्येक भागांत त्यांचे जिवंत विचार ओतले गेले आहेत याची खात्री पटते.

नाटकाचं कथानकच साधं आणि सुटसुटीत. चौदा वर्षं एकत्र नांदलेल्या मोहन व मीरा या जोडप्याच्या आयुष्यांत एक प्रसंग निर्माण होतो. मोहन कलावती नांवाच्या एका तरुण स्त्रीच्या मोहपाशांत सांपडतो. साधारणपणें अशा घटनेचा शेवट अगदीं ठराविक पद्धतींत होत असतो. मोहन कलेशीं लग्न तरी करील किंवा मीराचा व घराचा त्याग करून तो कलेबरोबर कुठंतरी निघून जाईल. परंतु या नाटकांत असं कांहींच घडत नाहीं. मोहन कलेला म्हणतो, 'कुणी सांगावं कला हें माझं प्रेम म्हणजे लुसलुसीत मांसावर गेलेली लांडग्याची नजर असेल. मीराचे केस पिकत चालले.' असं म्हणून मीरावरच आपलं खरं प्रेम असल्याची कबूली देतो आणि तात्पुरता विस्कळीत झालेला त्यांचा संसाराचा गाडा पुन्हा सुरळीत चालूं लागतो. या नाटकाचा शेवट वाचल्यानंतर स्वतःला नवमतवादी समजणारे कांहीं टीकाकार हें नाटक प्रतिगामी आहे अशी ओरड करतील याची मला खात्री आहे. परंतु ज्या दृष्टिकोनांतून ते हें नाटक प्रतिगामी ठरवतील त्याच दृष्टिकोनांतून बर्नार्ड शॉची एकूण एक नाटकं प्रतिगामी ठरतील. ज्या टीकाकारांना या नाटकांत प्रतिगामीत्वाचा वास येत असेल, त्यांनीं कला व मीरा यांच्या स्वभावचित्रणाकडे अधिक लक्ष पुरवावं म्हणजे त्यांचा संशय दूर होईल. कला ही या नाटकांतील खलनायिका नाहीं. एक सुशिक्षित, थोडीशी विलासप्रिय परंतु प्रेमाच्या अद्भुतरम्य कल्पनेनें भारावलेली तरुण स्त्री, मोहन सारख्या तरुण दिसणाऱ्या, कर्तृत्ववान, विद्वान व प्रतिभावान लेखकाच्या प्रेमांत सांपडली हा कांहीं तिचा दोष नाहीं. आणि हा दोष धरला तरी एकंदरींत तिच्या वर्तनांत छिचोरपणा किंवा उच्छृंखलपणा बिलकुल दृष्टीस पडत नाहीं. मोहनचं खरं प्रेम मीरावरच आहे, याची तिला खात्री पटतांच मोहनचं मूल आपल्या पोटांत आहे, हा अलिखित हक्क गाजवून त्याला आपल्याशीं लग्न करण्यास गळ घालण्याचा आचरटपणा तिच्या हातून घडला नाहीं. उलट ती मीरेला बजावते, कीं तिचं हें गुपीत मोहनला सांगायचं नाहीं. आणि मीरा तिला मोहनशीं लग्न करण्याचा आग्रह करीत असतां–ती निश्चयानं म्हणते, 'नको. माझ्या मुलाचं मी बघून घेईन; सक्तीनं मोहनला बांधून घ्यायचं नाहीं मला.

मला त्याचं प्रेम हवं होतं. दया नको.' सुप्रसिद्ध रशियन ग्रंथकार पँटेलिमान रोमेनॉव्ह यांच्या Without Cherry Blossoms या लघुकथेंतील नायिकेचं या कलेशीं कितीतरी साम्य आहे. हें स्वभावचित्र वकिलांनीं रोमेनॉव्ह-पासून उसनं घेतलं नाहीं हें मला पक्कं ठाऊक असल्यामुळं मी त्या साम्याचा या ठिकाणीं उल्लेख करीत आहे. एकंदरींत कलेचं स्वभावरेखन वकिलांनीं इतक्या सहृदयतेनं आणि आपुलकीच्या भावानं केलेलं आहे, कीं या नाटकांतील खरी नायिका कला कीं मीरा असा संभ्रम वाचकांना झाल्यावाचून राहाणार नाहीं.

मोहन आणि मीरा यांचा संसार चौदा वर्षं सुखानं चालला. त्यांचा नऊ वर्षांचा मुलगा श्याम हा त्या दोघांचा विरंगुळा, व त्या दोघांना एकत्र बांधणारा रेशमापेक्षां नाजूक असा धागा. राजकारणाची झळ सहन न झाल्यामुळं मीराच्या प्रेमळ आग्रहाला बळी पडण्याच्या मिषानं तो राज-कारणापासून अलिप्त राहतो. परंतु स्वतःचं समर्थन करण्यासाठीं त्याबद्दलचा सर्व दोष तो मीराला देतो. आपण खरोखर आकाशांत भराऱ्या मारणारे गरुड पक्षी; परंतु आपले पंख तोडून आपल्या पत्नीनं आपल्याला जायबंदी करून ठेवलं अशी त्यानं आपली समजूत करून घेतलेली. बिचारी मीरा संसारांत गुरफटलेली. पतीच्या व मुलाच्या सुखसोयीकडे पहातां पहातां तिचा जीव मेटाकुटीला आलेला. तिला आपल्या पतीच्या तळमळणाऱ्या आत्मवंचित अंतःकरणाची काय कल्पना ? अशा परिस्थितींत एखाद्या सुंदर तरुण स्त्रीनं त्याला सहानुभूति दाखवली, त्याच्या अंगांत असलेल्या व नसलेल्या गुणाचं ती रसभरित वर्णन करूं लागली तर पतंग ज्याप्रमाणें दिव्याच्या ज्योतीवर झेप घालतो तसा तो त्या स्त्रीकडे झेप घेणार हें उघड आहे. त्या नवीन स्त्रींत त्याला मादक सौंदर्य तर दिसतंच. परंतु आपल्या गुणाची पारख नसलेल्या, संसारांत नेहमी निमग्न राहणाऱ्या व साध्यासुध्या कपड्यांत नेहमी वावरणाऱ्या पत्नीच्या बाजूला अद्यावत् वेषभूषा करणारी ती स्त्री उभी राहिली म्हणजे अधिक खुलून दिसणार. हा प्रेमाचा त्रिकोण उद्भवला कीं मी वर म्हटल्याप्रमाणं त्याचं पर्यवसान ठराविक पद्धतीनं होत. समजा मोहन घर सोडून कलेबरोबर पळून गेला असता तर काय झालं असतं ? आज मीराचे केस पिकलेले दिसतात. दहा वर्षांनीं कलेचे केस पांढरे होतील.

मग तो कुणाच्या प्रेमपाशांत पुनः सांपडणार ? प्रीतीच्या फुलाला बहर आला आणि तें सुकलं कीं निर्माल्यवत् होतं. परंतु त्या फुलाचं निर्माल्य होण्यापूर्वी त्यांतून दुसऱ्या अत्यंत गोड व नाजूक अशा भावना निर्माण होतात. नवीन फुलपाखराच्या प्रेमाच्या जाळयांत सांपडून या भावनांचा चोळामोळा करायचा काय ? हा प्रश्न नाटककारानं या नाटकांत विचारला आणि त्याचं यथार्थ उत्तरही त्यानं दिलं आहे. एक चांगलं नाटक लिहिण्याची इच्छा वकिलाना सतावीत होती त्याप्रमाणं त्यानी खरोखरच एका सुंदर कलाकृतीला जन्म दिला आहे. या नाटकांतून अत्यंत गंभीर व विचार प्रक्षोभक असा अर्थ निघतो. ऋषीणां पुनराद्यानाम् वाचमर्थोनुधावति. त्याप्रमाणं वकिलानी अगोदर नाटक लिहिलं आणि नंतर त्यातून अर्थ निघाला. हा संबंध अर्थ विशद करून सांगायचा म्हणजे मला त्यावर एक मोठा ग्रंथ लिहावा लागेल. म्हणून त्या भानगडीत न पडतां मी शेवटीं इतकंच सांगतों कीं आजच्या तरुण नाटककारांमध्यें श्री. वकिलांचा नंबर अगदीं वर लागेल यांत तर मुळीं शंकाच नाहीं; पण मागील पिढीतल्या नाटककारानीं देखील त्यांचा हेवा करावा असं रचनाकौशल्य, संवादचातुर्य आणि कलात्मक गुंफण या नाटकांत आढळल.

२९-५-४३ —ग. य. चिटणीस

नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु

**श्री. नानासाहेब केदार**

यांना त्यांच्या मराठी नाट्यावरील

सक्रीय लोभाबद्दल

आदरपूर्वक समर्पण

## पात्रानुक्रम

**मीरा, श्याम, मोहन, कला.**

## काळ

अंक पहिला–३० एप्रील १९४३–संध्याकाळीं.

अंक दुसरा–१ मे १९४३–सकाळीं.

अंक तिसरा– } ७ मे १९४३ संध्याकाळीं.

अंक चवथा– } या दोन अंकांत एक तासाचें अंतर

## स्थळ

मुंबई दादर–विभागांतील एक रहाते घर.

# अंक पहिला

[ मोहनची बैठकीची खोली–प्रशस्तपणामुळें त्याला दिवाणखाना म्हणण्याचा मोह होतो, परंतु तितकासा भव्यपणा नाहीं दिसत. खोलीच्या डाव्या बाजूला एक पार्टिशन उभें केलेलें; त्या बाजूनें बाहेरून येण्याचें दार–पार्टिशन-मागून स्वयंपाकघरांत आणि न्हाणीघरांत जातां येतें. उजव्या बाजूला काटकोनांत पण जरा पुढें मोकळी कमान असलेला दरवाजा, तेथें निळे पडदे मधोमध बांधून घेतलेले, दारें उघडीं. पलीकडचे एकमेकाला भिडवून ठेवलेले पलंग दिसतात. पलंगावर चौकडी असलेले पलंगपोस. तेथूनच पलीकडे एका टेबलावर ठेवलेला रेडियो दिसतो. उजव्या बाजूला एक दार, पलीकडे खिडकी, खिडकीमध्यें टेलिफोन ठेवण्याची व्यवस्था, त्यामुळें फोन दोन्हीं बाजूंनीं घेतां येतो. फोनच्या पलीकडे लेखनसाहित्य ठेवलेलें एक सुबक टेबल व खुर्ची. उजव्या बाजूला पुस्तकाचें एक उघडें शेल्फ; त्यांत कांहीं पुस्तकें अर्धवट रचलेलीं, कांहीं खालीं अस्ताव्यस्त पडलेलीं शेल्फला एक सुंदर झालर असलेला निळा पडदा, आतां वर ओढून टाकलेला. खोलीच्या मध्यभागीं एक सुंदर गालिचा आंथरलेला, सोफासेट, टीपॉयवर 'किर्लोस्करचा' अंक पडलेला, पार्टिशनवर एक कॅलेंडर टांगलेलें, त्यांत एप्रील ३० ही तारीख दाखवलेली. खोलींत कुटुंबांतील व्यक्तींपैकीं कुणाचेंहि चित्र नाहीं. पडदा उघडतो तेव्हां मीरा ओणव्यानें कवितेच्या ओळी गुणगुणत एकेक पुस्तक झटकून पुसून शेल्फमध्यें ठेवीत असलेली आढळत्ये. मीराची तिशी उलटलेली, वर्ण गौर पण जरा करपलेला वाटतो. पोशाख घरगुती, साधा, नववारी पांढरें पातळ सौंदर्यलक्षी लाल रुंद किनार असलेलें, हातांत सोन्याची एकेक बांगडी, कानांत मोत्याच्या कुडी, सैलसा आंबाडा, गळयांत सोन्याची सांखळी असलेलें मंगळसूत्र–मधून मधून कपाळावर आलेले केंस उजव्या भुजेनें मागें सारण्याची संवय. दोन चार पुस्तकें ठेवून झालीं नाहींत. तोंच आंत असलेल्या घड्याळांत सहाचे ठोके ठणठण वाजतात. मीरा आपलें गुणगुणणें थांबवून वर पहात्ये आणि ठोके मोजू लागत्ये. ]

**मीरा**—दोन-तीन-चार-पांच-सहा-? ( एक सुस्कारा सोडून )-सहा वाजले! सहा वाजले तरी अजून संपता संपतच नाहीं.-( एक पुस्तक खालीं आदळ आपट करून )-बाई-बाई-किती तरी झुरळं!-एक चार दिवस लक्ष दिलं नाहीं कीं हें असं होतं.

[ पुस्तकें पुन्हां ठेवायला सुरुवात करत्ये. झोंपण्याच्या खोलींतून श्याम येतो. नऊ वर्षांचा चलाख मुलगा, आंगात रेशमी बंगाली सदरा आणि सैल पायजमा हा त्याचा पोषाख, डोक्यावरचे केंस विखुरलेले असतात. वर्ण सांवळा, हातांत खेळांतलें पिस्तुल. ]

**श्याम**—( पिस्तुल उडवीत ) संपलं नाहीं कां ग, आई ?

**मीरा**—संपलंच हं!-हीं येवढीं पुस्तकं ठेवलीं कीं—

**श्याम**—येवढी पुस्तकं ?-भूक लागली मला.

**मीरा**—करत्ये हं चहा, आतां बघ तरी किती थोडीं पुस्तकं आहेत तीं!

**श्याम**—मी येऊं कां मदतीला ?

**मीरा**—( पुस्तक ठेवीत ) तूं येणार मदतीला ?-झालं मग! तुझ्याच पुस्तकांची नि वह्यांची काळजी मला घ्यावी लागत्ये.

**श्याम**—पण मी आतां लहान नाहीं कांहीं, मोठा झालोय मी!

**मीरा**—आभाळालाच हात टेकले ना ?

**श्याम**—उगाच नाहीं तिसऱ्या वर्गांत गेलों.

**मीरा**—पराक्रमच केला कीं नाहींस ?

[ टेलिफोनची घंटा वाजिते. मीरा फोनकडे बघून श्यामला खुणावत्ये. ]

**श्याम**—मी बघूं!

**मीरा**—हूं! नांव विचार!

**श्याम**—( फोन घेतो. ) हॅलो,-मी श्याम-नांव काय तुमचं ?-कोण ?-मामा ?-मीराला पाठवूं? आई, तुला मामा बोलावताहेत; कसे बोलतात ग ? ( नक्कल करून ) मी-मी मामा!

**मीरा**—भारीच चावट होत चाललास तूं आतांशा!

[ हातचें पुस्तक टाकून फोनकडे येत्ये. ]

**श्याम**—मला पण बोलायचं आहे मामांशीं!

**मीरा**—( फोनवर )-हॅलो, काय मामा ?-मी मीरा-हूं-हूं-( काकुळतीनें ) नाहीं जमलं हो यायचं...( निषेधपूर्वक ) नाहीं बरं. तसं कांहींहीं नाहीं-साऱ्या जगानं गौरव केला तुमचा, त्यांतच आम्हीं आलों.-हूं-हूं-हूं-आम्हीं तुमच्या मुली, घरचीं माणसं काय नित्याचीच असतात.-उहूं-हूं-हूं-मला त्यातलं काय बरं कळलं असतं ? मी आपली साधी अशिक्षित-हूं-हूं-नाहीं हो, वेळच मिळत नाहीं, कुठल्या सभा नि कुठलीं व्याख्यानं ?-शिवाय दोन दिवस झाले गडी नाहीं,-हूं-हूं-( हांसत्ये )-ते बरे होतील गडी ? राबावं लागतं मला-हूं-हूं-हो-माझे नाहींत बाई पतिदेव-बरं सांगतां ? जन्माची गांठ पडली. तेव्हां सांभाळायला नको त्यांनां ?-हूं-हूं-येईन-नाटकाला येईन ! हूं-हूं-मामा-हा श्याम बोलतोय तुमच्याबरोबर-( हांसत्ये )-हौस आहे ना ?-मोठ्यांचं बघायचं नि तसं करायचं-आहे खरा जरा शहाणा वयाच्या मानानं-( श्यामला )-चल ये, त्यांना पुन्हां जायचं आहे कुठं तरी !

**श्याम**—( खचली बेट्याची हिंमत ) काय बोलूं ग ?-नकोच नाहीं तर !

**मीरा**—एहेरे बोलूभाऊ, नाहीं तर मग बडबडत असतोस.

**श्याम**—असं काय ग ? सांग ना !

**मीरा**—( त्याच्याजवळ फोन देऊन हं-म्हण !

[ त्याच्या कानांत पुटपुटत्ये, तो सारें कांहीं समजलें अशा अविर्भावानें मान हालवतो, श्याम फोनवर बोलत असतांना मीरा त्याला एकेक वाक्य कानांत सांगत्ये व तेंच ते पुन्हां उच्चारतो. ]

**श्याम**—हॅलो, मामा-मी तुमच्या समारंभाला येणार होतो-पण बाबांनी मला आणलं नाहीं-तुमच्यासारखाच लेखक होणार आहे मी-तुमचा समारंभ झाला ना-तसाच माझा देखील होईल-( आठवण झाली बेट्याला कशाची तरी, फोन तसाच धरून मीराला- ) आई ! ते भाऊसाहेब म्हणत होते ते पण म्हणूं कां ग ?

**मीरा**—( त्याच्या हातचा फोन घेऊन ) चल गाढव कुठला ?-हॅलो, मामा-( निषेधाच्या स्वरांत )-नाहीं हो-तुम्हांला कसं म्हणेन मी ? हें आहे ना एक शहाणं घरीं-त्याला शिकवलं होतं-त्याच्या साठाव्या वाढदिवसाला तुम्हीं अध्यक्ष व्हा ही विनंति करायला !-हूं-हूं-( हासत्ये )-जगाल तुम्हीं

शंभर वर्षं, तुमचं तर बाळपणच संपायचं आहे अजून !–हो–येईन–न येईनात कां ते ? वा–वा–बरं सांगता, टाकून कशी देऊं त्यांना ! आहे तर !– श्याम हें लहानगं बाळ, तर ते थोरलं ! दोन्हीं बाळंच–त्यांना कोण संभाळील ?–असतोच नाहीं तरी आम्हीं माता–बराय–( फोन ठेवत्ये. )

**श्याम**—मी देखील येणार नाटकाला !

**मीरा**—एहेरे, नाटकाला येईन म्हणे. धड दोन वाक्यं देखील सांगितल्या-शिवाय बोलला नाहींस ना ?

**श्याम**—आम्हीं असं शिकवलेलं बोलत नसतो पोपटासारखं.

**मीरा**—लेखक व्हायचं आहे ना तुला ?–मग पोपटासारखंच बडबडावं लागेल तुला !

**श्याम**—कुठल्या आवाजांत ? खऱ्या कीं पिचलेल्या ? ( घाबरला बेटा )– नको आई मला नाहीं व्हायचं लेखक !

**मीरा**—सोपं असतं रे, मोठमोठीं इंग्रजी पुस्तकं घ्यायचीं–

**श्याम**—( अदबीनें ) आई, मी वैमानिक झालों तर नाहीं कां ग चालणार ?

**मीरा**—कशाला ? लोकांच्यावर बांब टाकायला ?

**श्याम**—नाहीं–सांगू तुला. माझी एकच इच्छा आहे. विमानांतून आमच्या बाईच्या घरावरून झडप मारायची आहे मला.

**मीरा**—डोक्यावरून कां नाहीं रे ?

**श्याम**—माझं तेंच म्हणणं होतं, पण सूदन म्हणतो, विमान कोसळून पडेल !

**मीरा**—बाईवर तुमचा येवढा राग कां रे ?

**श्याम**—तिच्या वर्गात शिकायला यायचं होतंस, म्हणजे समजलं असतं. सदानकदा आमच्यावर खोकत असते. कांग ती असं करत्ये ?

**मीरा**—तिला किनई मुलबाळ नाहीं. मुलं नसलेल्या बायका चिडखोर होतात.

**श्याम**—अन् तूं चिडत्येस माझ्यावर ती ?

**मीरा**—चिडत्ये कां रे मी ?...चांगलं शिकवतात शाळेत.

[ स्टुलावर चढून मीरा वरच्या भागावरची धूळ झाडून काढत्ये. ]

**श्याम**—तूं काय शिकली होतीस ग शाळेंत ?

[ एक पुस्तक उचलून बघू लागतो ]

**मीरा**—मी मुळीं कुठल्याच शाळेंत गेल्ये नव्हत्ये.

**श्याम**—हो, कांहीं तरीच. मग कुठं शिकलीस वाचायला ?

**मीरा**—तुझ्या बाबांनीं शिकवलं ! तेवढं पुस्तक दे बरं !

[ श्याम पुस्तक उचलतो, तें पडतें; पुस्तकामधून एक फोटो बाहेर येतो. मीराला पुस्तक दिल्यावर श्याम फोटो उचलतो आणि बघतो. ]

**श्याम**—कुणाचा ग फोटो हा ?

**मीरा**—( मागें वळून ) बघूं !

**श्याम**—परत देशील ?

[ ती खाली उतरत्ये, तो फोटो देतो. ]

**मीरा**—ओळख बरं ?

**श्याम**—ओळखूं ! काय देशील ?

**मीरा**—चहाची वेळ झालीच आहे.

**श्याम**—सांग, काय देशील ? चहा नको.

[ दारावरची घंटा वाजते, श्याम दार उघडतो. बाहेर जातो. ]

**मीरा**—कोण आहेरे, श्याम ?

[ श्याम, मोहन आणि कला येतात. मोहन पस्तिशी उलटलेला, दिसायला मात्र तिशीच्या आंतच, सिल्कसूटमध्यें, कला पंचविशीतलीं, वेणीचे दोन शेपटे, कानांत झुमक, ओंठ निसर्गतःच लाल, वर्ण कर्पूरगौर, पांचवारी पातळाचा डौल तिच्यामुळें वाढला कीं तिचा डौल पातळामुळें वाढला हें सांगणें कठीण. पोशाखांत रंगसंगति आणि सूक्ष्मतम कलाकुसर. पदर गळ्याभोंवती लपेटून घेण्याची लकब. भारीच लडिवाळ आणि मोहक; हातांत किती बांगड्या आहेत याची मोजदाद अंकगणितांत पहिला नंबर आलेला श्याम देखील करूं शकणार नाहीं. तिच्या हांसण्यांत मोहक गोडवा असतो. ]

**मोहन**—या मिस् चौधरी–कलावती चौधरी, लेखनाची हौस आहे यांना ! ही मीरा–मिसेस देसाई.

**कला**—( हांसत )–नी हे मोहन देसाई !

**मीरा**—( कलेला नमस्कार करून ) ऐकलं होतं मी आपलं नांव! ( मोहनला )-आधीं मला कळवायचं तरी होतं. मी अशी या अवतारांत...

**मोहन**—पाहृयला नाहीं आल्या कांहीं त्या तुला!

**कला**—( हंसून ) नाहीं हो! बघायलाच आल्ये होत्ये मी! नेहमी सांगायचे हे तुमच्याबद्दल!

**मीरा**—( हांसून ) निंदा केली असेल माझी! संवयच आहे त्यांना.

[ बोलणें चाललें असतांना श्यामची मात्र कोणीच ओळख करून देत नाहीं. मोहन नेकटायची गांठ सोडत पलंगांच्या खोलीत जातो. श्याम नव्या पाहुणीकडे कुतूहलानें बघत उभा राहतो. त्याच्या हातीं अजून देखील तो जुना फोटो आहे. ]

**कला**—स्तुति करीत होते.

**मीरा**—म्हणजे निंदाच! म्हणाले असतील–मीराला कसलीच हौस नाहीं, कुठं माझ्या व्याख्यानाला येत नाहीं. "–पण घरांतल्या जबाबदाऱ्या कुणीतरी पार पाडल्याच पाहिजेत. हें तरी खरं ना?

**कला**—गडीमाणसं असल्यावर कसलीं कामं रहातात?

**मीरा**—गड्यामाणसांवरच घर संसार सोपवला तर त्याला खाणावळीचं स्वरूप येईल, कलाताई!

**श्याम**—( दम निघत नाहीं बेट्याला ) आई, आतां कां ग उशीर?

**मीरा**—खरंच बाई! तुझी टुणटूण कांहीं संपली नाहीं अजून! ( कलेकडे बघत ) आल्येच हं मी! कालपासून गडी देखील नाहीं.

[ ती मागल्या खोलींत जायला निघाली. श्याम तिच्या पाठोपाठ जाऊं लागतो. कला त्याचा हात धरत्ये, तो संकोचतो पण थांबतो. ]

**कला**—ये ना, नांव काय तुझं?

**मीरा**—श्याम, बैस हं आत्याजवळ, येतील ते आतां कपडे बदलून!

[ मीरा जात्ये, श्याम कलेजवळ सोफ्यावर बसतो. ]

**कला**—( श्यामला )-आत्या नाहीं हं म्हणायचं मला? म्हातारी आहे वाटतं मी? मावशी म्हणायचं मला!

**श्याम**—मावशी?–( जरा विचारांत पडतो )

**कला**—कां रे, मावशी म्हणायला हरकत आहे तुझी कांहीं ?

**श्याम**—नाहीं, तशी अडचण नाहीं, पण—

**कला**—पण काय ?

**श्याम**—मावशी म्हटलं, कीं मग एकेरी नांव आलं, आवडेल तुम्हांला ?

**कला**—( त्याला कुरवाळत ) आवडेल बरं !–खुशाल म्हण !—( श्यामच्या हातून फोटो गळून पडतो. तो उचलण्यासाठी श्याम खालीं वाकतो. कला उचलून घेत्ये फोटो )–कुणाचा रे हा फोटो ? तुझा ?

**श्याम**—माझा नाहीं. असता–तर तिथं पुस्तकांत नसता ठेवला कांहीं !

**कला**—मग कुणाचा ?

**श्याम**—तेंच विचारीत होतो मी आईला ? ( कला लक्षपूर्वक फोटो बघत्ये, हें पाहून )–तुम्हांला माहीत आहे वाटतं ?

**कला**—काय म्हणालास ?

**श्याम**—तुमच्या ओळखीचा आहे हा फोटो ?

**कला**—श्याम, रागवेन बरं मी अशानं तुझ्यावर !

**श्याम**—( अरेच्या मावशी देखील रागावणारीच कां– ) काय केलं मी ?

**कला**—आपलं काय ठरलं होतं ?

[ मोहन खिडकीतून डोकावून बघतो. पोशाख तलम धोतर, नेहरु शर्ट. ]

**मोहन**—( हांसत )–अरे वा, तुम्हां दोघांची मैत्री जुळलेली दिसते.

**कला**—( हांसत ) छेः, रागावत्ये आहे मी श्यामवर !

**मोहन**—( बाहेर येत )–कां ? त्यानं काय केलं तुझं ?–( चटकन थांबून ) आय मीन–तुमचं !–कायरे श्याम ?

[ श्यामला कांहींच कळत नाहीं हें, तो निसटूं पाहतो. कला त्याला जवळ ओढत्ये. ]

**कला**—आमचं ठरलं होतं. त्यानं मला एकेरी नांवानं हांक मारायची. मावशी म्हणायचं कबूल केलं आहे त्यानं मला !

**मोहन**—( श्यामकडे पाहून ) होय ? आमच्या श्यामसारखा जिवलग दोस्त मिळायचा नाहीं दुसरा. त्याची माझी तर फारच दोस्ती.

**श्याम**—( धीर आला बेट्याला )-बाबा हो, आज रात्रीं जायचं ना आपण समुद्रावर ? कीं कराल कालच्यासारखं ?

[ श्यामच्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं मोहनला बोलायचें कारणच पडत नाहीं. आंतून मीरा हांक मारत्ये–‘ श्याम ’ ]

**मोहन**—पळ, जा, आई बोलावत्ये–( सिगारेट पेटवतो. श्याम जातो. त्याच्या पाठोपाठ दृष्टि वळवत जरा कुजबुजतच )–पाहिलंस एकदाचं तिला ? ( कला गंभीरपणें होकारार्थी मान हालवत्ये )–काय वाटलं ?

[ “कांही नाहीं ” अशा अर्थानें कला मान हालवत्ये. जरा वेळ दोघेही स्तब्ध असतात. मोहनची नजर पडद्यामागच्या दूरच्या स्वयंपाक घराकडे असते. एक कप फुटल्याचा आवाज. ]

**मीरा**—( आंतून ओरडल्याचा आवाज ) फोडलास ना ? घे, आणखी ही बशी देखील फोडून टाक म्हणजे बरं ! आताशा कप कोण महागले नि तुझा हा हैदोस !

[ श्याम हिरमुसलेला बाहेर येतो. ]

**मोहन**—( त्याच्याकडे पहात ) मारलं कारे आईन ?

[ श्याम गाल फुगवून संदिग्धपणें मान हालवतो. कला त्याला जवळ घेत्ये. ]

**कला**—मारलं तुला ? मुलांना मारणं बरं नसतं !–बालकांच्या मनोविकासाचं शिक्षण दिलं पाहिजे या आयांना !

**मोहन**—( तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां ) श्याम, बघतो हं काय झालं तें ?

**श्याम**—( कलेकडून मोहनकडे येत ) आज मी तुमच्या जवळच झोंपेन ! बोलायचं नाहीं आपण आईशी !

[ चहा घेऊन मीरा येत्ये. ]

**मोहन**—कां मारलंस ग याला ?

**मीरा**—( टीपॉयवर ट्रे ठेऊन ) बघायचं असतं आंत येऊन आपल्या लाडक्या लेकाचे प्रताप ! ( श्यामकडे बघत )–अन् मारलं कांरे मी तुला ?

[ श्याम बोलत नाहीं–कलेमागे दडून बसतो. ]

**मोहन**—किती कप फोडलेस रे श्याम ?

**मीरा**—सांगना ?–( कलेला )–आतां बघा तुम्हींच कलाताई ! या महागाईमुळं जिणं नकोसं झालेलं आहे. हे आणारे, ते आणारे, सारखं चाललेलं असतं. कातावून जात्ये मी कधीं कधीं !

**मोहन**—पण मिळतं ना सारं ?

**मीरा**—तुम्हींच आणतां जसं कांहीं ? जीव रंजीस येतो माझा !–साखर नाहीं रे, गहूं नाहीं रे, इकडचं ब्रह्मांड तिकडं उचलून ठेवावं लागतं. तुम्हांला काय ? वर्तमान पत्रांत लेख लिहायचे, व्याख्यानं द्यायचीं, नी पुस्तकं छापायचीं !

**कला**—मोहन देसाईबद्दल किती अभिमान वाटतो आम्हांला !

**मीरा**—अभिमान वाटतोय मला, तुम्हां सगळ्यांच्या अभिमानाबद्दल–पण यांचं हें असं पाहिलं म्हणजे—( चटकन थांबत्ये )–काय मी वेड्यासारखं सांगत सुटल्ये तुमच्याजवळ ?–

[ कपांमध्ये चहा ओतायला सुरुवात करत्ये ती. मोहन लिहिण्याच्या टेबलाजवळ जाऊन सिगारेटचें पाकीट उघडतो. त्यांतून एक सिगारेट काढून पेटवतो. ]

**मोहन**—लवकरच शुद्धीवर आलीस म्हणायची !– ( चहाचा कप कलेपुढें करीत )–मला कधीं कधीं असं वाटतं मिस् चौधरी, हिला देखील व्याख्यानं द्यायला न्यावं !–बोलण्यात अशी तडफ आहे म्हणतां ?

**कला**—( कप घेत ) खरंच मीराताई, तुम्हीं देखील व्याख्यानं द्यायला शिका !

**मीरा**—( हंसून ) शिका कशाला ? जशीं कांहीं मी व्याख्यानं दिलीच नसतील !

**कला**—( कप खाली ठेवून आश्चर्यानें ) खरंच ! तुम्हीं व्याख्यानं दिलीत ? ( मोहनकडे बघून )—केव्हां हो ! सांगितलं नाहींत मला तुम्हीं ?

**मीरा**—( गोष्ट बदलून ) चहा निवून चालला–( श्यामला आर्जवून )–श्याम, तुला हा मोठा कप !

[ श्याम एकदम गंभीर चेहेरा करून बसतो, त्याला आतां आधार मोहनचा, त्याच्याकडे बघत राहतो. मीरा त्याचें हें सोंग पाहून हांसते. कलेचे लक्ष नसतें या सर्वांच्याकडे ।

**कला**—मोहन, केव्हां हो दिलींत यांनीं व्याख्यानं ?

**मोहन**—फार जुनी गोष्ट आहे ती !–श्याम, बेटा, घे चहा, मग आपण आज रात्रीं समुद्रावर जायचं ना ?

**मीरा**—आज सांपडणार आहे वाटतं फुर्सद ?

**श्याम**—मला नको आईचा चहा !

**मीरा**—( तिच्यांतला हुकुमशहा जागृत झाला )–घ्यायचा आहे कीं नाहीं ?

**कला**—( शांततावादी बरं कां ! ) मुलांना मारणं बरं कां मीराताई ?

**मीरा**—पहिलीच भेट आहे, नाहींतर दिलं असतं याचं उत्तर !

**मोहन**—बघितलंत मिस् चौधरी, हें असं आहे. ती काय सांगणार होती तें सांगूं मी ?

**मीरा**—( निषेधानें ) चला,–येईलच त्यांना लग्न झाल्यावर अनुभव !

( कलेला )–त्यांचं ऐकूं नका हो कांहीं देखील ! ( श्यामला )–श्याम, नाहींना घेत चहा ? बरं, नको घेऊस ! नाटकाला नाहीं नेणार !

**मोहन**—कुठलं नाटक ?

**श्याम**—आम्हांला नको तुझं तें नाटक !

**मीरा**—नको ना, बरं तर मग ! मी पण घेत नाहीं चहा.

**श्याम**—नको घेऊस !

**कला**—श्याम, असं करूं नये. घे हा चहा. तूं वेडा कां आहेस इतरांच्या सारखा ? चल, चटकन पिऊन टाक.

[ कला श्यामच्या तोंडाजवळ कप नेत्ये. तो जरा आढेवेढे घेत कप घेतो. मिरा मूकहास्य करत्ये. सगळेच चहा पिऊं लागतात. ]

**मीरा**—कलाताई, बिस्किटं नकोत ना त्याला ?

[ श्याम घेतां येतील तेवढीं बिस्किटें ताब्यांत घेतो. ]

**मोहन**—किती छळशील त्याला ?

**मीरा**—बरं झालं ? परवां मी एकटीच जाईन नाटकाला देखील !

**मोहन**—परवां तूं खरंच नाटकाला जाणार आहेस ?

**मीरा**—तुम्हीं नव्हतां गेला म्हणे ? परवां येणार कां ?

**मोहन**—जमलंच नाहीं. परवां देखील जमायचं नाहीं.

**मीरा**—मला त्यांची भूमिका बघायची होती.

**मोहन**—स्वतःच्या नाटकांत खुद्द नाटककारानं भूमिका करायची ही कांहीं पहिलीच वेळ नाहीं.

**कला**—इंग्लंडमध्यें तर जॉन ड्रिंक वॉटरनं स्वतःच्याच नाटकांत भूमिका केलेली होती. काय बरं त्या नाटकाचं नांव ?—

**मोहन**—अब्राहाम लिंकन ! त्याचं तें नाटक पडलं होतं. पण स्वतः भूमिका करून त्यानं तें सांवरून धरलं, इतकंच नव्हे तर पुढं तें लोकप्रिय देखील केलं !

**कला**—मराठींत देखील औंधकर, टिपणीस, फडके यांनी स्वतःच्या नाटकांत भूमिका केलेल्या आहेत. तुम्हाला माहीत असेलच हें मीराताई ?

**मीरा**—नाहीं बाई, लग्नाआधीं मुळीं मी नाटकंच पाहिलीं नव्हतीं. त्यांतून मी ही अशी अशिक्षित, आमच्या लग्नाला चांगलीं आतां बारा चौदा वर्षं झालीं, पण मी सारीं दोन कीं तीन नाटकं पाहिलींत आणि तीं हीं मामांचीच.

[ श्यामनें साऱ्या बिस्किटांचा फन्ना उडवला. खुषीत आली स्वारी आतां.]

**श्याम**—बाबा हो, बारा कीं चौदा ?

**मीरा**—( वेडावून )-बोललं बाळ ?

**मोहन**—पण तुला आठवायला नकोत किती वर्षं झालीं तें ?

**मीरा**—श्यामला आतां नववं लागलं ! त्याच्या आधीं राम झाला होता-

**कला**—( आश्चर्यानें )-राम ? कुठं आहे तो ?

**मोहन**—श्यामच्या आधीं चार वर्षं एक मुलगा झाला होता आम्हांला !

**कला**—मग ?

**मोहन**—त्याच्या मृत्यूचा प्रसंग मी बघितला नाहीं; त्यावेळीं मी तुरुंगात होतो. पण मला तरी तो अजून आजोळीच असल्यासारखा वाटतो.

[ तो सिगारेट पेटवून खिडकीबाहेर बघूं लागतो. श्याम त्याच्याजवळ येऊन त्याचा हात धरतो व त्याला खेटून उभा राहतो. ]

**मीरा**—( कपबशा गोळा करीत ) जुन्या आठवणी काढून रडत बसा. पुरुष म्हणवता स्वतःला !

[ मीरा आंत जात्ये. कला सोफ्यावर पडलेला फोटो उचलून घेत्ये. आणि मोहन जवळ जात्ये. ]

**कला**—हा फोटो कुणाचा ? त्याचाच कां ?

**श्याम**—कुणाचा हो बाबा ?

**मोहन**—( खिडकीला टेकून उभा राहत ) होय, त्याचाच. त्याचे सारे फोटो फाडून टाकले होते मी ! त्यावेळीं मी प्रत्यक्षपणें राजकारणांत भाग घेत होतो. सीतापूरला काम करीत होतो मी. एका गिरणीतले कामगार संपावर गेले होते, दुसरीतले जाऊं पहात होते. मला अटक झाली.

**कला**—आणीक ?

[ मीरा येत्ये. श्यामला जवळ ओढत्ये. मोहन स्तब्ध राहतो. ]

**मीरा**—वेड लागलंय त्यांना !–( मोहनला ) ती गोष्ट पुन्हां उच्चारायची नाहीं म्हणून शपथ घातली होतीना ?–कलाताई, सांगेन मी केव्हांतरी, आतां नको. ( मोहनला )–झालंय तरी काय आज तुम्हांला ?–श्याम, बाळ, आज आपल्याला समुद्रावर जायचंना ?–( मोहनला )–नेणार कां याला तुम्हीं समुद्रावर ?

**मोहन**—आणि तूं ?

**मीरा**—हें बघितलंत ! सारी पुस्तकं खायला सुरुवात केली होती झुरळांनीं ! हें संपलं कीं मग स्वयंपाक !

**मोहन**—( चिडून ) तो संपला कीं जेवण, तें संपलं कीं झोंप !

**मीरा**—( सत्यवक्तेपणाचा आव आणून )–भांडण असतं ना अधून मधून ! तें नाहीं सांगितलंत ?–संसाराच्या रहाटगाड्याला जुंपलेली मी !–मला कसं ऊठसुठ समुद्रावर यायला जमेल हो कलाताई ?

**कला**—तेंहि खरंच !–बरं, येत्ये मी मीराताई, ओळख झाली, आनंद झाला. श्याम, चलतोस कां माझ्या घरीं ? तिथंच रहा.

**मीरा**—झालं–यांच्या नाहीं तर माझ्या पाठीशी दडून झोंपायला सोकावली आहे स्वारी !–तो कसला येणार ?

**कला**—होय कारे श्याम ?

**मीरा**—जातोस ?

[ श्याम मोहनच्या पाठीशी दडतो. सगळेच हांसू लागतात, तेव्हां तो मीराला वेडावून आंत जातो. ]

**कला**—बराय, येत्ये मी मोहन !

**मोहन**—( मीराला ) बस स्टॅंडवर येऊं पोहचवून !

**मीरा**—लवकर या पण जरा, श्यामला देखील न्या जरा समुद्रावर ( आंत दृष्टी फेंकून )-श्याम, बघरे हे जाताहेत. तुला जायचं ना ?

**श्याम**—( खिडकीतून डोके काढून )-नाही ! ( नाहींसा होतो. )

**मोहन**—( शोधत ) माझे स्लीपर्स ?

**मीरा**—कपाटाखाली ठेवले होते श्यामनं !

**मोहन**—( पायाने स्लीपर्स ओढीत ) किती धूळ साचली आहे ? पांड्या लेकाचा कुचकामाचा आहे. पुसायला तरी दे कांहीं !

**मीरा**—बाहेर निघालांत, ते पुन्हां हात घाण व्हायला नकोत !

( आपणच स्लीपर्स पदरानें पुसत्ये )

**कला**—अय्या, काय हे मीराताई ?

**मीरा**—( हांसून ) लग्न केलं म्हणजे कळेल आपोआप !

**मोहन**—अहो, तेव्हां मी देखील हिच्या वहाणांना पॉलिश करीत असे.

**मीरा**—चला, कांहीं तरीच ! नाहीं हो कलाताई !

[ मोहन व कला जातात. मीरा दार आंतून बंद करत्ये; स्वयंपाकघराकडे जात्ये. टेलिफोनची घंटा वाजत्ये. श्याम खिडकीतूनच टेलिफोन घेतो. ]

**श्याम**—हॅलो, मी श्याम-बाहेर गेले ते-आहे आई ! बोलावतो. आई- ( खिडकीकडे मीरा येत्ये ) टेलिफोन आहे शांताताईचा !

**मीरा**—( फोन घेऊन ) हॅलो, काय ? मीराच मी ! नाहीं-ते गेले बाहेर पण मला कसं जायला मिळेल ! रहाटगाडगं असतं ना संसाराचं ! हूं-हूं-रहाटगाडग्यांनीं जीवन येतं खरं; पण तें मिळतं कुणाला ? मळयातल्या झाडारोपांनां, आम्ही आपले कोरडेच-हूं-हूं-जमलं तर कळवीन, नंबर सांगून ठेवा-श्याम, कागद पेन्सील घे बरं ! ( श्याम कागद आणतो. ) पेन्सील देना !

**श्याम**—मी घेऊं लिहून !

**मीरा**—नको-हॅलो, हं सांगा-(लिहून घेत्ये)-हूं-हूं-हूं-हूं-हूं! ताबडतोब कळवीन-( ऐकत्ये-हांसत्ये ) आतां तुम्हींच शिकवा मला ! माझ्या आईपेक्षां दोन वर्षांनीं लहान आहांत तुम्हीं !-होय-म्हणूनच तर सांगत्ये-क्लास काढा म्हणजे येईन-त्यांची विद्वत्ता जगासाठीं-माझ्या कामीं कां येणार ती ? —झालं तर मग-बरं !

[ फोन ठेवत्ये, आतांपर्यंत तिच्या चेहेऱ्याकडे उत्सुकतेनें पहाणारा श्याम तिच्याशी बोलण्याचा प्रयत्न करतो. ती पुढच्या भागांत येत्ये. श्याम तिच्या पाठोपाठ येतो. ]

**श्याम**—काय म्हणत होत्या ग शांताताई ?

**मीरा**—म्हणत होत्या-बोलणार नव्हतास ना माझ्याशीं !

**श्याम**—( बरी आठवण झाली ) मग नाहींच बोलणार ! रागावलीस कशाला ?

**मीरा**—आतां पाया पडूं कां ?

**श्याम**—( तिचा पदर धरून ) सांगशील मला ! राम माझा भाऊ होता ?

**मीरा**—( स्तब्ध राहून ) हूं ! ( मानेने होकार देते. )

**श्याम**—कसा होता ग ? माझ्यासारखाच ?

**मीरा**—( पूर्ववत ) हूं !

**श्याम**—( जिकीरीस येऊन ) हें काय ग, सांग ना !

[ तिला ओढत ओढत सोफ्याजवळ नेतो. आपण बसतो, तिला बसवूं लागतो. ती बसत्ये, त्याला कुरवाळत्ये. ]

**मीरा**—बघितलास तूं फोटो ?

**श्याम**—आवडला मला !

**मीरा**—( त्याला जवळ घेऊन ) तुझ्यासारखाच होता तो ! कदाचित तोच तुझं रूप घेऊन आला असेल !

**श्याम**—मी नाहीं अं ! मी आपला श्यामच आहे.

**मीरा**—कुणाचा ? माझा ना ?

**श्याम**—तुझा ?-बरं तुझा !-मी म्हणणार होतो बाबांचा !

**मीरा**—त्यांचा, नी माझा !-माझा नी त्यांचा ! आम्हां दोघांचा आहेस तूं !

**श्याम**—पण कां ग, आवडत असे तुला राम ?

**मीरा**—आवडायचा ना !

**श्याम**—माझ्याहून देखील ?

**मीरा**—त्यावेळीं कुठं होतास रे तूं ?

**श्याम**—मग आवडत असून देखील त्याचा फोटो असा टाकून दिलास ?

**मीरा**—आठवण नको यायला होती त्याची !

**श्याम**—म्हणूनच माझ्याजवळ सांगितलं नाहींस ?

**मीरा**—होय, म्हणूनच !

**श्याम**—कां बरं ?

**मीरा**—तुला माहित नाहीं, पण तुझ्या बाबांना व मला खूप त्रास सोसावा लागला. तुझे बाबा तेव्हां असे श्रीमंत नव्हते. त्यांना वाटायचं आपण गरीबांचं कल्याण केलं पाहिजे. मोठ्या मोठ्या आकांक्षा होत्या त्यांच्या, त्यांनीं आपली चांगली नौकरी सोडून दिली—

**श्याम**—तूं पण सोडलीस ? त्यांना सोडूं दिलीस ?

**मीरा**—नाहीं. मी त्यावेळीं असत्ये तर असं झालंच नसतं. मी नसतं असं करूं दिलं. त्यावेळीं आमचं लग्न व्हायचं होतं !

**श्याम**—अन् मी पण झालो नव्हतो.

**मीरा**—चावट, तूं रे कसा होशील ?

**श्याम**—पण तूं तर म्हणायचीस, देवानं आभाळातून टाकलं मला म्हणून !

**मीरा**—मग खरंच आहे तें !

**श्याम**—देव सारीं मुलं दवाखान्यांतच कसा टाकतो ग ? खोटं आहे तें !

**मीरा**—बरं खोटं तर खोटं !

**श्याम**—कां ग, तूं नेहमीं देव देव म्हणून सांगत्येस. दिसला तुला तो ?

**मीरा**—कुणाला ठाऊक, देव आहे कीं नाहीं तो !

**श्याम**—सांगूं मी ?

**मीरा**—सांग बघूं !

**श्याम**—देव आभाळात राहतो. पृथ्वीवर कधीं देखील येत नाहीं. मी पुढं वैमानिक झालो म्हणजे आणीन त्याला विमानातून खालीं !

**मीरा**—आतां पळ बघूं ! मला पुस्तकं ठेवायचीं आहेत !

**श्याम**—पण पुढं काय झालं ग बाबांचं ?

**मीरा**—काय व्हायचं ! कांहीं नाहीं !

**श्याम**—लहान नाहीं मी आतां ! खोटं बोलून फसवत्येस होय ?

**मीरा**—किती छळशील रे ?

**श्याम**—( तिला बिलगून ) रागावलीस तूं ? राम तुला माझ्यापेक्षां देखील आवडायचा ?

**मीरा**—राम नी श्याम दोघेही मला सारखेच ! असता तर-चांगला येवढा येवढा दिसला असता.

**श्याम**—मी पण दिसतो ना ? ( तिच्यापुढें उभा राहतो. तिचे हात धरून ) मग पुढं काय झालं ग बाबांचं ? तुमच्या लग्नात मजा आली कां ग ?

**मीरा**—( सांगत सुटली आतां )-एका काळोख्या रात्रीं तुझे बाबा लपत छपत आमच्या खेड्यावर आले. कसला तरी भयंकर आरोप होता त्यांच्यावर, तुझ्या आजोबांनीं आश्रय दिला, कांहीं दिवसांनीं आमचं लग्न झालं. नी त्यांचं लपणं उघडकीला येऊन ते कैद झाले.

**श्याम**—आतां पकडतात तसं ?

**मीरा**—होयं तसंच !

**श्याम**—तूं सांगितलं होतंस पोलिसांना ?

**मीरा**—मी सांगेन कां रे वेड्या ?-उलट माझ्या डोळयाची धार खळली नाहीं.

**श्याम**—बरं मग ?

**मीरा**—वर्षांनं सुटून आले ते, त्यांच्या बरोबर राहूं लागल्ये मी ! तेव्हां आपलं हें असं घर नव्हतं ! रामच्या दुधाची देखील कधीं कधीं पंचाईत पडायची ! त्या स्थितींत संप झाला म्हणून त्यांना पुन्हां पकडलं !

**श्याम**—हे संप कां होतात ग ?

**मीरा**—मला सांगू दे आतां. तुझ्या बाबांच्या बरोबर मी देखील सभांना जायची ! कामगारांनीं एक मोर्चा नेला, त्याच्याबरोबर गेल्यें मी ! रामला

बरोबर न्यायचं नव्हतं मी ! पण टळायचं नव्हतं तें ! घोडे घातले मोर्चावर पोलिसांनीं !–घोड्याची टाप लागून पोर जागच्याजागीं कळवळून मेलं–चेंदून निघालं !

**श्याम**—बदमाश साले !

**मीरा**—( कठोरपणानें ) श्याम ? कुठं शिकलास ह्या शिव्या ?

**श्याम**—( नरमून )–राग आला आई ? ( तिला मिठी मारून )–नाहीं अं मी पुन्हां असं बोलणार ?–पुढं काय झालं ग ?

**मीरा**–रामचं तें तसं झालं; हे इकडे तुरुंगांत ! वेडी झाल्ये होत्ये मी जवळजवळ !–रामचे फोटो बघत बसायची मी, नी रडायची !–जामीनावर सोडलं यांना पुढं ! यांनीं रामचे सारे कपडे, फोटो, :पाळणा, सारं कांहीं जाळून टाकलं.

**श्याम**—कां ग ?

**मीरा**—रामची आठवण बुजावी म्हणून !

**श्याम**—ती बुजली कां पण ?

**मीरा**—होय, बुजलीना !

**श्याम**—केव्हां ? कशी ग ?

**मीरा**—( त्याला जवळ घेत ) ही अशी ! तूं झालास नी माझा राम पुन्हां आला.

**श्याम**—रामसारखा दिसतो कां ग मी !

**मीरा**—हूं ! अगदीं तसाच !

**श्याम**—बाबांनां विचारीन मी ! मग काय झालं ग तुमचं ?

**मीरा**—काय व्हायचं ? तुरुंगांतून ते सुटून आले, नी मी त्यांच्याजवळून शपथ घेतली. तेव्हांपासून ते कध्धीं कध्धीं देखील राजकारणाच्या भानगडींत पडले नाहींत. मग आम्हीं इथं आलो. जगाशी दोन हात केले, आज कसलीही उणीव नाहीं आम्हांला !

**श्याम**—तुला सांगून ठेवतो मी आई ! आपण बुवा बाबांच्यापेक्षां खूप खूप मोठ्ठं व्हायचं ठरवलं आहे. एकदां मोठा तर होऊं दे. दररोज संप करीन मी !

**मीरा**—नी मग विमानांचं काय होणार ?

**श्याम**—तें तर आहेच ग ! विमान आणि संप; संप आणि विमान !

**मीरा**—पराक्रमी बापाचा पराक्रमी मुलगाच तूं !

[ आंत जात्ये, जातांना दिवा लावत्ये. ]

**श्याम**—आई येऊ कां ग मी आंघोळीला ?

**मीरा**—( आंतून ) नको आतां दिवेलागणीच्या वेळीं !

**श्याम**—बाबा मात्र वाटेल तेव्हां आंघोळतात ! बाबांच्याप्रमाणं मोठ्ठं मोठ्ठं व्हायचं आतां–आणि मग संप नी विमान ! विमान गेलं उडत, संप चालू; संप गेला उडत विमान चालू !–( टेबलाजवळ जातो, सिगारेटचें पाकीट उचलून त्यातली एक सिगारेट काढतो. )–काय मजा वाटत असेल बाबांना !–काय ऐटीनं ओढतात ते ? ( फर्रकन काडी ओढतो. )–ज्या ऐटीनं बाबा ओढतात, त्याच ऐटीनं मी पण ओढणार !

[ सिगारेट पेटवतो, मीरा येत्ये, त्याच्या हातून घेते हिसकावून सिगारेट, एक गदगा देत्ये पाठींत. ]

**मीरा**—कारट्या, एकेक नवीनच शिकतोस ?

**श्याम**—काय केलं ग मी ? बाबा ओढतात तेव्हां मारत्येस कां त्यांना ?

[ दारावरची घंटा वाजत्ये, ती दार उघडायला जात्ये. श्याम जरा लगबगीनेंच मागोमाग येतो. मोहन येतो–त्याचा श्याम हात धरतो. ]

**मोहन**—काय झालं रे श्याम ?

**श्याम**—बाबा हो, हिनं मला मारलं ! आतां आईला मारा तुम्हीं !

**मोहन**—कां ग मारत्येस त्याला तूं ?

**मीरा**—विचारा आपल्या गुणी बाळाला ! कसा जीव नकोसा करून टाकतोय माझा !

**श्याम**—थांबा बाबा. काठी आणून देतो मी ? ( आंत पळतो. )

**मोहन**—अरे श्याम–कां ग त्याला मारलंस तूं ?

**मीरा**—त्यानं सिगारेट ओढलेली चालेल तुम्हांला ?

**मोहन**—कळत नाहीं त्याला, समजावून सांगावं !

**मीरा**—पण त्यानं विचारलं, बाबा बरे ओढतात ?—तर मग काय उत्तर द्याल ?

**मोहन**—असं विचारील तो ?

**मीरा**—आतांच विचारलं होतं त्यानं !

**मोहन**—मी देईन त्याचं उत्तर !

[ श्याम काठी घेऊन येतो. ]

**श्याम**—ही घ्या बाबा काठी, मारा हिला !

**मीरा**—तुझ्याच पाठीत घालायला सांगत्ये, थांब जरा.

**मोहन**—श्याम, तूं सिगारेट ओढलीस म्हणे—

**श्याम**—( गोंधळून ) पण मी कांहीं दररोज ओढत नसतो.

**मोहन**—लहान मुलांनीं असं करावं कां रे ?

**श्याम**—कां बरं ? वाईट असतं तें ?

**मीरा**—होय, वाईट असतं !

**श्याम**—लहान मुलांनीं केलं कीं वाईट; आणि मोठ्यांनीं केलं कीं चांगलं ? हें कसं हो बाबा ?

**मीरा**—द्याना, याचं उत्तर !

**मोहन**—उत्तर कसलं द्यायचं ! आजपासून सिगारेट ओढायची नाहीं हें ठरलं !

**मीरा**—अगदीं सुधाकराचाच अवतार आणलांत !

**मोहन**—बघ तरी पुन्हां शिवतो कां सिगारेटला ?

**मीरा**—चला, भलतंच काय? श्याम, हें बघ, तूं मोठा हो, नी मग कींनई खूप खूप सिगारेटी ओढ. पण आतां नाहीं अं !

**श्याम**—( कुरकुरत ) मी बाबांच्यापेक्षां उशिरा जन्माला आलो, हा माझाच अपराध वाटतं ?

**मीरा**—होय, अपराधच !—चला आतां न्हाणीघरांत पळा !

**श्याम**—खूप पाणी घेऊं मी ?—बघ नाहीं तर रागावशील पुन्हां ?

**मीरा**—माझा राग तेवढा लक्षांत राहतो—( श्याम आंत जातो, आंतला दिवा लावतो. )—तुझाच टावेल घे, नाहीं तर घेशील कालच्यासारखा यांचाच !

**श्याम**—( आंतून ओरडतो )-माझाच घेतला.

**मीरा**—( बजावून ) मुलाचं शहाणपण वाढतच चाललं! त्याला जरा धाकांत ठेवायला हवं!

**मोहन**—मारून?

**मीरा**—नाहीं, सिगारेट सोडून!

**मोहन**—( कौतुकानें ) आठवतं तुला-हा लहानपणी तुझ्या देवपूजेत शिरला होता. बेट्यानं तुझे देव पळवले होते.

**मीरा**—त्यावेळीं लहान होता तो.

**मोहन**—तरीपण तूं त्याला मारलंस!-

**मीरा**—किती रागावलांत तुम्हीं माझ्यावर!

**मोहन**—सारं आठवतं तुला?

**मीरा**—त्यावेळची एकच गोष्ट आठवत्ये मला-आठवतं-तुम्हीं त्याची समजूत घालूं लागलांत—

**मोहन**—म्हटलं होतं-"आईचं घर उन्हांत बांधू!" खूष झाला बेटा!

**मीरा**—( अभिमानानें )-पण पुढं कसं विचारलं? आहे आठवण?

**मोहन**—म्हणाला-"त्या घरांत आईच राहील!"

**मीरा**—अन् तुम्हीं होय म्हणता क्षणींच माझ्याकडे बघूं लागला लबाड!

**मोहन**—तुझ्या हांसण्यामुळं आला त्याला संशय! तूं मग म्हणालीस-"या घरांत राहतील श्याम नी त्याचे बाबा!"

**मीरा**—असं म्हटलं मात्र मी!-लागलीच सरसर गुलाम उतरला तुमच्या आंगावरनं आणि बिलगला मला येऊन!

**मोहन**—नाहीं तरी तुझ्याकडेच ओढ आहे त्याची!

**मीरा**—पण आतांशा तर तुमच्याच पाठीशी दडलेला असतो.

**मोहन**—त्या प्रसंगानं तुझ्या आयुष्यांत एक मोठा फरक घडून आला मीरा!

**मीरा**—कसला!

**मोहन**—तूं देवाची पूजा सोडलीस!

**मीरा**—देवाची पूजा आधींच सोडायची होती मला ! रामच्या वेळींच मला देवाचा राग यायला लागला होता. नंतर त्या दिवशी श्यामच्या चिमण्या गालांवर माझीं पांची बोटं उमटलेलीं पाहिलीं नी वाटलं–पुरे हें देवाचं कौतुक !

**मोहन**—परवांच माझ्या व्याख्यानांत या घटनेचा मी उल्लेख केला होता.

**मीरा**—कधीं ? ( आठवून ) खरंच ! त्या दिवशीं सांगितलं होतं खरं असंच कांहीं तरी ! पण लक्षांतच राहिलं नाहीं. श्यामच्या परीक्षेची गडबड होती ना ?

**मोहन**—उगीच नाहीं तुझ्याबद्दल इतर बायका बोलत !

**मीरा**—( हांसून ) तुमच्याजवळ बोलतात ?

**मोहन**—होय, माझ्याजवळ ! आजच त्या मिस् कलावती विचारीत होत्या.

**मीरा**—काय विचारीत होत्या ?

**मोहन**—मीराताईनां तुमच्या ॲक्टीव्हीटीज मध्यें इंटरेस्ट कसं वाटत नाहीं ?

**मीरा**—त्यांना सांगा, दुरूनच डोंगर सुंदर दिसतो.

**मोहन**—तुला कशी काय आवडली मिस् चौधरी ?

**मीरा**—कां ? माझ्या आवडी निवडीवर त्यांचं लग्न ठरायचंय वाटतं ?

**मोहन**—तसं नव्हे ग !

**मीरा**—खरं सांगूं !

**मोहन**—तूं कधींच खरं बोलत नाहींस !

**मीरा**—( खट्याळपणानें )–तिचं तुमच्यावर प्रेम आहे.

**मोहन**—( गांगरून )–चल, कांहीं तरीच.

**मीरा**—इतक्या बायका ओळखीच्या असतील तुमच्या ! किती जणी जवळ बोललांत तुम्हीं माझ्याबद्दल ?

**मोहन**—बऱ्याच जणींना तुझी माहिती आहे !

**मीरा**—तरीपण त्या नाहीं कधीं आल्या ?–हीच आली तेवढी !–कां ?

**मोहन**—त्यांच्याजवळ मी तुझ्याबद्दल खूप खूप बोललों.

**मीरा**—जेव्हां एखादा पुरुष आपल्या बायकोबद्दल दुसरी जवळ एकांतात बोलत असतो—

**मोहन**—एकांतात ?

**मीरा**—होय, एकांतात !–तेव्हां त्याचं त्या दुसरीवर प्रेम असतं महाराज!

**मोहन**—प्रेम ?

**मीरा**—( हांसत ) होय, प्रेम ! आपल्या संसारातल्या उणीवांचं रडगाणं गात असतो तो तिच्याजवळ !

**मोहन**—( निषेध करून ) काय हें ? भारीच संशयी झालीस तूं !

**मीरा**—( निर्वाळा देत ) नाहीं बरं !–मला माझ्या मोहनची खात्री आहे ! गंमत केली मी !–झालं आतां !

[ श्याम, कपडे नसतात दुसरे अंगावर, फक्त एक टावेल लपेटून; एक इंग्रजी कविता बडबडत बाहेर येतो. ]

**श्याम**—**बेबी, बेबी, डू नॉट् क्राय,**
**ममी मेक्स चिल्ड्रन क्राय–**
**डॅडी कॅचेस बटर फ्लाय–**
**बेबी, बेबी, डू नॉट् क्राय !**

**मीरा**—झालं ! आटपलं ना

**मोहन**—आतां इंग्रजी शिकायला लागलास वाटतं ?

**श्याम**—काल कीं नाहीं शेजारचीं मुलं म्हणत होतीं, नी तो गाणारा म्हातारा ज्यू नाहीं का ?–तो त्यांच्या पाठी मागं धांवत होता. मी पण म्हणणार आहे आतां.

**मीरा**—अर्थ तरी ठाऊक आहे कां ?

**श्याम**—बाबा सांगतील मला ! बाबा सांगाल ना ?

**मोहन**—म्हण बरं !–

**श्याम**—बेबी बेबी डू नॉट् क्राय !

**मोहन**—बेबी, बेबी, रडायचं नाहीं.

**मीरा**—( श्यामला ) समजलं ! रडायचं नाहीं !

[ त्याचें आंग पुसायला सुरवात करत्ये. ]

**श्याम**—ममी मेक्स चिल्ड्रन क्राय !

**मोहन**—आई मुलांना रडवीत असत्ये.

**श्याम**—रडवत्येच नाहीं तरी ही !

**मीरा**—होय ना, मग काढू कां एक चिमटा ?

**श्याम**—काढ बरं!–सांगेन बाबांना! पुढं सांगाना!–डॅडी कॅचेस बटर फ्लाय !

**मोहन**—बाबा फुलपांखरूं पकडतात.

**मीरा**—हेहि खरंच ना रे श्याम ?

[ मोहनकडे बघून हांसत्ये व आंत निघून जात्ये. ]

**श्याम**—आई, कांहो हांसली ?

**मोहन**—वेडी आहे ती !

[ सिगारेट उचलून तोंडांत घालतो, पेटवूं लागतो, आठवण झाल्यावर ती फेंकून देतो, आणि सोफ्यावर आंग टाकून देतो. श्याम वडलांकडे पहात राहतो. ]



# अंक दुसरा

[ पहिल्याच अंकातलें स्थळ, आतां पुस्तकावर नीट पडदा सोडलेला, टीपॉयवर तीनचार वर्तमान पत्रें पडलेलीं, पडदा उघडतो तेव्हां आठाचे ठोके पडतात. श्याम बुश शर्ट आणि विजार घातलेला. पायांत बूट, पलीकडच्या दारांतून पलंगावर झोंपलेला मोहन दिसतो, त्याच्यावर सूर्याचीं किरणें आलेलीं. श्याम स्वतःशीच "बेबी बेबी डू नॉट् क्रॉय" बडबडत कॅलेंडरची तारीख तीन करतो. स्वयंपाक घरांतून परस्पर तिकडे पलंगाजवळ मीरा येत्ये. ]

**मीरा**—अहो,–अहो महाराज–संपादक ! श्याऽम–

[ श्यामला हांक मारत्ये–तिचा बाहेर जाण्याचा पोशाख असतो. जरी कांठाचे जांभळे पातळ, तसाच ब्लाऊज, डोक्यात वेणी माळलेली. ]

**श्याम**—काय ग ?

**मीरा**—उठव रे यांना, तोंवर चहा आणत्ये मी, आपल्याला उशीर होईल !

**श्याम**—बाबा, अहो बाबा,–बाबा–

[ मोहन या कुशीवरून त्या कुशीवर वळतो. ]

**मीरा**—( कप घेऊन येत्ये )–नाहींना उठले ?–नेहमीं यांचं हें असं ! कुठं जाईन म्हटलं—

**श्याम**—आई पाणी आणू ?—

[ मीरा मान हालवत्ये–श्याम आंत जातो. ]

**मीरा**—अहो–[ त्याला गदगदा हालवत्ये, तो कुशी वळवून तिचे हात धरून ओढतो ]–इश्श, हें काय ?

[ त्याचे हात हिसडत्ये, तो डोळे उघडतो. ]

**मोहन**—( दचकून उठून बसतो. ) कोण तूं कां ? मला वाटलं—

[ डोळे चोळीत पलंगाखाली उतरतो. श्याम पाणी घेऊन येतो. ]

**श्याम**—उठाना बाबा ! आम्हांला जायला उशीर होतो.

**मीरा**—कोण वाटलं तुम्हांला ?

**मोहन**—कोणीं नाहीं, स्वप्नांत होतो मी !

**मीरा**—कोण दिसली स्वप्नांत ?

**मोहन**—( आश्चर्यानें ) दिसली ? कसं हें तुला सारं कळतं ?

**मीरा**—( हांसत ) तुम्हींच नेहमी म्हणायचं–तुझ्या हृदयाचे ठोके माझ्या हृदयांत पडतात, तुझ्या डोळ्यातल्या प्रकाशानं मला जग वेगळं भासूं लागतं !

**श्याम**—बाबा, चहा घ्याना, आम्हांला जायला उशीर होतो.

**मीरा**—याल कां एक वाजतां तिकडे म्हणजे मग !

**मोहन**—( मधेंच ) बघ, माझ्या जेवणाची तूं काळजी करूं नकोस.

**मीरा**—चहा निवून चालला. श्याम, निघा आतां; नाहीं तर उशीर होईल.

[ चहा घेत तो पुढच्या भागांत येतो, श्याम त्याच्या पाठोपाठ येतांना बूट घसरून पडतो, पण लागलीच उठून उभा राहतो. ]

**श्याम**—लागलं नाहीं कांहीं ?

**मीरा**—कसं लागेल ? नाटकाची घाई आहे ना !

[ पायांत वहाणा घालून दार उघडल्ये. श्याम बाहेर निघतो. ]

**मोहन**—म्हणजे तूं आतां येणार आहेस तरी केव्हां ?

**मीरा**—कां ? मी बाहेर कुठं जाऊंच नये वाटतं ?

**मोहन**—तसं नव्हें ग !–येतांना मला फोन कर; म्हणजे बघ तरी राणी सरकारसाठीं चहा तयार ठेवतो.

**मीरा**—कांऽहीं नको. एक चहा करायला जाल, अन् साऱ्या घराची उलथापालथ करून ठेवाल.

[ श्याम पत्रें घेऊन येतो, मीरा त्याच्या हातचीं पत्रें घेऊन पत्ते बघल्ये, आपलें एक पत्र घेऊन बाकीचीं मोहनला देल्ये, मोहन आपलीं पत्रें चाळतो. ]

**मीरा**—( आपलें पत्र वाचीत )–मावशीनं बोलावलंय मला नी श्यामला !

**मोहन**—(आपल्या पत्रातून डोकें वर काढून)–मग कधीं जायचं ठरवत्येस ?

**मीरा**—( त्याच्याकडे रोखून बघत ). माझ्या जाण्याची येवढी उत्कंठा लागली ?

**मोहन**—तसं नव्हें ग,–तूं आजकाल भारीच बोलत्येस मला !

**श्याम**—( मीराचा हात ओढत )–आई चल ना ग; उशीर होईल !

**मीरा**—चल बाबा.

[ दोघेहि जातात, मोहन आंतून दार बंद करतो, लगबगीनें फोनवर जातो व कनेक्शन घेतो. ]

**मोहन**—आसरा रेस्टोरंट ? हॅलो–तुमच्या फॅमिलीमध्यें एक मिस् चौधरी, –मिस् चौधरी–होय, त्या बसल्या असतील,–बघा–त्यांना सांगायचं–मीराताई तिथं येणार नाहींत–तुम्हींच या !–( फोनवर कानोसा घेत )–काय ?–कुणींच नाही तिथं !–बरं–बरं ! थँक्यु–( रिसीव्हर ठेवतो )–विलक्षण आहे; गेली तरी कुठं ही ? काल रात्रीं ठरवलं होतं तसं–आणि आज बघावं तर पत्ता नाहीं. चाळवत्ये आहे सारखी मला !–जादू आहे तिच्या सौंदर्यांत.

[ कवितेचे चरण गुणगुणत आंत जातो, दारावरची घंटा वाजते, खूप जोरजोरानें, शेवटीं दार देखील ठोठावल्या जातें. ]

**मोहन**—( आंतून )–कोण आहे ?–आलो–आलो–आलो !–डॅम् इट् ! ( जरा लगबगीनेंच बाहेर येतो, दार उघडतो, कला पंजाबी पोशाख केलेली, गंभीर चेहरा असलेली, उभी असते )–येना आंत ?–( ती उंबरठ्यावरच दोन्हीं दारांवर हात देऊन उभी राहत्ये, व त्याच्याकडे मादक पण सकरुण नजरा रोखून एक उसासा सोडत्ये. )–येना ! ( तिचा हात धरून आंत आणतो. )

**कला**—परवानगी आहेना मला आंत यायची ?

**मोहन**—तुला कुणाची परवानगी हवी कला ?

**कला**—तुझ्या बायकोची ! मोहन, किती दिवस ही अशी चोरी करायची ?

**मोहन**—यांत चोरी कसली ?

**कला**—नाहीं तर काय ? तुझ्या बायकोचा हक्क हिरावून घेत्ये आहे मी ! तिला काय वाटेल ?

**मोहन**—कांहींहि वाटायचं नाहीं तिला ! तिला मुळी हें समजणारच नाहीं.

**कला**—मीराताईचा तुझ्यावर विश्वास आहे ना ?

**मोहन**—म्हणायचं आहे काय तुला ?

**कला**—आपलं हेंऽ तिच्या लक्षांत आलं म्हणजे ?

**मोहन**—शक्यच नाहीं. तशी ती भोळी आहे.

**कला**—आम्हीं बायका नाही तरी भोळ्याच असतो. विश्वासानं खुशाल तुम्हां पुरुषांच्या खांद्यावर मान टाकतो—

**मोहन**—आणि ती आम्हीं बेधडक कापतो. असंच म्हणायचं आहे ना तुला?

**कला**—म्हणाल्ये कां रे मी तसं! ( त्याला बिलगत )-आम्हीं बायका पुरुषावर आंधळेपणानं प्रीति करतो.

**मोहन**—पुरुषांचं तसं नसतं; निदान मी तरी डोळसपणानं तुझ्यावर प्रेम करीत आहे.

**कला**—काय दिसलं तुला माझ्यांत?

**मोहन**—फुलानं भ्रमराला म्हणावं, काय दिसलं तुला माझ्यांत-कां घालतोस माझ्याभोवतीं रुंजी? चंद्रानं सागराला म्हणावं, काय दिसलं तुला माझ्यांत-कां येतोस येवढा उचंबळून?

**कला**—त्या जुन्या शिळया कल्पनांचं नाटक पुरे! मोहन, कां रे मला आपलं वेड लावलंस?

**मोहन**—तूं भेटलीस अन् जीवनातलं कटाळवाणं नीरसपण निघून गेलं!

**कला**—तूं भेटलास, नी जीवनांत नवं चैतन्य आलं. एक नवं विश्व माझ्या हृदयांत निर्माण झालं. माझ्या डोळयांत नवं तेज खेळूं लागलं.

**मोहन**—प्रत्येक नवी कल्पना सुचली म्हणजे वाटतं, कलेला आवडेल?

**कला**—प्रत्येक नवी कल्पना वाचली म्हणजे वाटतं, किती प्रतिभा आहे माझ्या मोहनमध्यें!

**मोहन**—पण त्या प्रतिभेमागं कुठली प्रेरक शक्ति आहे? आहे तुला ठाऊक?

**कला**—कुठली!-मीराताईची?

**मोहन**—नाहीं, तिनं माझी प्रतिभा लुळीपांगळी करून टाकली, माझ्या गगनभेदी कल्पनाचे पंख तोडून टाकले. माझं जीवन गृहपाशानं बांधून टाकलं! तुझी भेट होईतों एखाद्या जीवन्मृताप्रमाणं मी जगत होतों. तूं आलीस-माझ्या जीवनांत एक नवा संदेश घेऊन आलीस.

**कला**—काय आहे असं माझ्यांत?-इतर बायकांसारखीच एक हाडामांसाची पुतळी मी!

**मोहन**—पण या हाडामांसाच्या पुतळयांकडूनच निसर्ग आपलं कार्य साधून घेत असतो. माझ्यांतल्या उर्मी सांगतात-तूं जगांतली एक अत्यंत सुंदर स्त्री आहेस. माझ्या देहकणांतला प्रत्येक अणुरेणु तुझ्याकडे ओढला जातो.

एकाकीपणानं आपले पंख पालवीत नीरव आकाशांत अहेतुक घिरट्या घालणाऱ्या पांखराला अवचित तसाच दुसरा साथीदार मिळावा—

**कला**—देशील मला अशीच साथ! ज्या प्रीतीच्या साक्षात्कारासाठीं माझं अंतःकरण आसुसलेलं होतं ती प्रीति मला तुझ्या लोचनांत आढळली, ज्या निराकार तत्त्वाला माझा यौवनगंध समर्पण करायचा होता, तें तत्त्व तुझ्या स्वरुपांत साकार झालं. मला माझा पुरुषोत्तम सांपडला.

**मोहन**—कला, तुझं पहिलं पत्र आलं, तेव्हां कसं वाटलं होतं मला!—

**कला**—तिकडे माझी कोण तगमग चालली होती!-वाटलं, तुम्हीं कसलं उत्तर पाठवणार!

**मोहन**—पण मी लागलीच उत्तर पाठवलं ना?

**कला**—तुझं उत्तर आलं, कित्ती आनंद झाला! कॉलेजांत असतांना किती तरी तरुणांनीं प्रीतीचं जाळं फेकून पाहिलं; पण त्यांत न सांपडणारी मी, तुझ्या-तुझ्याच जाळ्यांत सांपडल्ये.

**मोहन**—सागरांच्या लाटांवर सूर्यप्रकाशांत वर उसळी घेऊन चमकणाऱ्या या मासळीला मी माझ्या जिवाच्या जाळ्यांत झेलून घेतलं.

**कला**—आणि आतां तडफड तडफड चालवली आहेस तिची!

**मोहन**—आणि माझ्या मनाची तगमग कशी सांगू मी तुला?

**कला**—तुझ्या पत्रांपत्रांमधून वेदना व्यक्त व्हायच्या तुझ्या!

**मोहन**—तुझं पत्र आलं कीं एक थंडगार शिडकावा मिळत असे माझ्या पोळलेल्या मनाला!

**कला**—आहेत अजून तीं माझीं पत्रं?

**मोहन**—आहेत ना!

[टेबलाचा खण किल्ली लावून उघडतो. आंतून पत्रें काढतो. कला त्याच्याजवळ जाऊन उभी राहल्ये. दोघेही पत्रें चाळतात.]

**कला**—हें मी इंदूरहून लिहिलेलं होतं—नी हें बघितलंस कां?—तुझं पत्र आलं नव्हतं चार दिवस—त्यावेळीं लिहिलेलं—!

**मोहन**—(आठवण्याचा प्रयत्न करून)—काय बरं झालं होतं त्या वेळीं—होय, मीरा आजारी होती तेव्हां, डॉक्टरांच्या धांवपळीनं कातावून गेलो होतो मी!

**कला**—मग बायकोच्यापुढं माझी कसली पत्राज ?

**मोहन**—कला, तुला माझं हृदय उघडं करून दाखवलेलं आहे मी ! या पत्रांनीं तुझं मनोगत मला सांगितलेलं आहे. तुझ्या प्रीतीनं मला जिंकून घेतलं ! विश्वास नाही वाटत तुला ? ( पत्रें पुन्हां ड्रॉवरमध्यें ठेवतो. )

**कला**—आपली पहिली भेट झाली आठवत्ये तुला ?

**मोहन**—काश्मीरला जायचं ठरवलं होतं, पण तुला प्रवास नको होता. एकाच जागीं स्वस्थ पडून राह्यचं होतं.

**कला**—नी मग आपण त्या लांब अनोळखी अशा गांवी गेलों—

**मोहन**—अंधारांतून अज्ञात प्रदेशाकडे धांवत जाणाऱ्या जीवनातल्या चैतन्याप्रमाणं आपली गाडी पुढंपुढं जात होती. आपण अंधाराचा भेद करून पलीकडचं वस्तुजात बघण्याचा प्रयत्न करीत होतो.

**कला**—आज देखील भविष्यकाळांतल्या घटनाक्रमांविषयींच मला कुतूहल वाटतं.

**मोहन**—पुरुष कधीं उद्याचा विचार करीत नाहीं.

**कला**—दोन वर्षांचा काळ कसा अगदीं उडत्या पांखरवाणी भुर्रदिशी निघून गेला. काळाला हे असे पंख नसते तर !–

**मोहन**—तर काय झालं असतं ?

**कला**—तुला मोहांत पाडणारं हें माझं सौंदर्य असंच टिकून राहिलं असतं.

**मोहन**—मला तुझा मोह वाटत नाहीं–तुझ्यावर प्रेम आहे माझं !

**कला**—असेल ही !–तें प्रेम असंच कायम राहिलं असतं !

**मोहन**—पण काळाच्या अचलपणाशी त्याचा काय संबंध !

**कला**—मी म्हातारी झाल्ये नसल्ये. माझं सौंदर्य असंच राहिलं असतं.

[ आरशाजवळ जाऊन उभी राहत्ये. तिच्या पाठोपाठ मोहन जातो, तिचे हात धरतो. ]

**मोहन**—पण काय झालं असतं, आहे ठाऊक ?

**कला**—काय झालं असतं ?

**मोहन**—तूं तरुण ही पण झाली नसतीस ! अगदीं जन्माला आलीस तशीच नी तेवढीच राहिली असतीस.

**कला**—( जाणीवेने )–खरंच !

**मोहन**—( लाडांत येऊन ) नी मग या माझ्या छोनीचे मी अस्से—

**कला**—( त्याच्या हातून सुटका करून घेत )–नको, आतां नको, कुणी तरी येईल !

**मोहन**—यायच्या आधीं मीरानं फोन करायचा कबूल केलं आहे; आणि तीही येईल दुपारी—आतां नव्हे.

**कला**—त्यांना जातांना पाहिलं–नी तशीच वर चढल्ये. कंटाळल्ये बसून आसऱ्यात ! म्हणून आलें नी झाडाखालीं उभी राहिल्ये.

**मोहन**—( टोमणा देऊन ) सरता सरत नव्हताना काळ ? अन् आतां तर तुला तो अचंचल असावा असं वाटतं ?—( तिला सोफ्यावर आणून बसवतो )—काळ अचल असता, तर–तूं–मी सारेच जन्माला तरी आलो असतो कां ? काळाच्या अचलपणानं विश्वाचा लय घडवून आणला असता ?

**कला**—( व्याकुळतेन ) पण म्हातारं व्हायचं म्हणजे—

**मोहन**—तुला भीति वाटते म्हातारपणाची ?

**कला**—खोटं कशाला सांगू ? वाटत्ये.

**मोहन**—होय ना, म्हणूनच आपल्या हातीं जे थोडे फार प्रीतीचे क्षण येतात, ते उराशी कवटाळून आपण आपलं जीवन गोड करून घेऊं !–उद्याचं कुणी पाहिलं !

**कला**—पण–पण–तुझ्या बायकोचं काय ?

**मोहन**—खोटं कशाला सांगू ! ज्या दिवसापासून तूं माझ्या जीवनांत आलीस, त्या दिवसापासून तिच्याबद्दल माझ्या मनांत नाहीं नाहीं ते विचार येतात; वाटतं एक आणखी मोठा आजार यावा.

**कला**—आणिक—?

**मोहन**—दुष्ट विचार आहे तो–मित्रा, स्वार्थी आहे मी !

**कला**—पण–त्यांच्या सुखाच्या आड मी येणार नाहीं.

**मोहन**—काल रात्रीं समुद्रावर आपण बसलों होतो. तूं माझ्या जवळ काय म्हणाली होतीस तेव्हां ?—

**कला**—काय म्हणाल्ये होत्ये ?

**मोहन**—सांग ना तूंच !

**कला**—पण आपण असं लग्न केलं तर काय म्हणतील लोक !

**मोहन**—मला लोकांचं कांहींच वाटत नाहीं; वाटतं ते मीराचं !

**कला**—बायकोला भितोस तूं !

**मोहन**—मला कधींच कुणाची भीति वाटली नाहीं; पण—

**कला**—पण काय ?

**मोहन**—आपली भेट झाली नसती तर किती चांगलं झालं असतं ?

**कला**—आपली भेट झाली हे किती चांगलं झालं !

**मोहन**—पण यांतून मार्ग कसा काढायचा तें सांगना !

**कला**—कसला मार्ग शोधूं ! आपल्या दोघांच्या वाटा चुकल्या. प्रीतीच्या चकव्यानं आपल्याला या आडवाटेवर आणून सोडलं ! आतां कसली वाट विचारायची नी शोधायची. जगाच्या अंतापर्यंत आपण असेच रान तुडवीत जाऊं.

**मोहन**—अगदीं असंच, असंच बोलली होती ती !

**कला**—ती ? कोण मिराताई कां ?

**मोहन**—होय पण असं वाटतं, आतां या क्षणीं हें सारं घरदार सोडावं, आपण दोघं दूर दूर कुठंतरी, अज्ञात निर्जन प्रदेशांत वणवण भटकत फिरावं.

**कला**—थकवा आला कीं एकमेकांच्या खांद्यावर माना टाकून विसावावं !

**मोहन**—भूक लागली कीं एकमेकांचीं चुंबनं घ्यावीं नी त्यांतच—

**कला**—भूक किती वाईट असते. या भूकेनंच माणूस जगाचा गुलाम झालेला आहे.

**मोहन**—आकाशांत गिरक्या घेणारा चंडोल देखील भूक लागली कीं गाणं थांबवून जमिनीवर उतरत असतो.

**कला**—मग उतरना ! मोहन, माझा मोहन, ( त्याच्या विस्कटल्या केसांवर ब्रश फिरवत्ये ) मोहन, खरंच आपण कुठंतरी निघून जाऊंया ! इथल्या साऱ्या आठवणी विसरून जाऊं, नी नव्या उमेदीनं, नव्या उल्हासानं नवं घरकुल थाटूं. हा थाटलेला संसार मीराचा आहे, माझा नाहीं. हें सारं तिनं तयार केलेलं आहे, जमवलेलं आहे.

**मोहन**—पण त्याला कारण माझा पैसा ! पैसा असल्यावर कुणीहि सामान्य बाई बाजारांतून कोरा करकरीत संसार विकत घेऊन येईल.

**कला**—मला तुझं कांहीं नको, मला केवळ तूं हवास ! तुझ्या खांद्याला खांदा लावून मी या पृथ्वीच्या पाठीवर कुठंहि यायला तयार आहे.

**मोहन**—तुझ्यासारखी सहचारिणी मिळाली असती तर —

**कला**—पण आतां मिळत्ये ना !

**मोहन**—गोंधळून गेलों आहे मी ! भाग्यदेवतेचं हे अकल्पित वरदान पाहिलं म्हणजे धन्यता वाटते मला !–पण—

**कला**—आतां पण कशाला ?–भोंवतालच जग अजून कुजबुजायला लागलं नाहीं, तोंवरच काय तो निर्णय आपण केला पाहिजे.

**मोहन**—जग कशाला आपली उठाठेव करील ?

**कला**—माणसं नेहमी दुसऱ्यांच्याच उठाठेवी करीत असतात ! उद्यां तुझ्या बायकोला संशय आला म्हणजे—

**मोहन**—तिचं मात्र कांहींच कळत नाहीं मला ! आता सकाळीं मला जागं करतांना तिनं माझे हात धरले होते. मी स्वप्नांत होतो. मला वाटलं तूंच मला जागं करीत आहेस.

**कला**—आणिक ?

**मोहन**—तिनं स्वप्नांत दिसणारीचं नांव विचारलं ! काल देखील म्हणाली–

**कला**—माझं तुझ्यावर प्रेम जडलं असंच ना ?

**मोहन**—होय ! तुला कसं समजलं ?

**कला**—प्रीति धृतराष्ट्रासारखी आंधळी असली तरी मत्सराला इंद्राप्रमाणं हजार डोळे असतात ना ? तुझ्या बायकोला संशय आला खास !

**मोहन**—मला नाहीं वाटत.

**कला**—चल, इथं नको राह्यला आतां. कदाचित् ती मधूनच परत देखील यायची !

**मोहन**—कला, तूं भित्येस तिला ? तूं जगाला भित्येस ?

**कला**—वाटतंय खरं, जरा कससंच !

**मोहन**—संताप येतो या ढोंगाचा ! वाटतं हीं सारीं ढोंगी कलंकित नीतीचीं वस्त्रं फेकून द्यावींत आणि—

[ दारावरची घंटा वाजत्ये, दोघेंहि एकमेकांकडे प्रश्नार्थक मुद्रा करून बघत राहतात. दारावरची घंटा पुन्हां वाजत्ये. कला आंत जाऊं लागते. तो तिला थांबवून धरतो. ]

**श्याम**—( बाहेरून )—बाबा, दार उघडा.

**कला**—( पुटपुटत ) ती आली आहे—

**मोहन**—काळजी करूं नकोस तूं !

[ जाऊन दार उघडतो, मीरा व श्याम येतात, श्याम लंगडत लंगडत येतो. मीरा कलेकडे एक नजर फेकत्ये. कला खालीं मान घालत्ये. श्यामला घेऊन झोंपायच्या खोलीकडे मीरा जाऊं लागल्ये. ]

**श्याम**—बाबा हो, माझा पाय मुरगळला !

**मोहन**—काय झालं रे ?—कां ग, नाटकाला गेलाच नाहींतना शेवटीं ?

**मीरा**—हें ध्यान होतं ना बरोबर ! वाटेनं देखील धड चालत नाहीं. बापाचं नांव राखायचं आहे ना त्याला !

**कला**—काय झालं हो त्याला ?

[ श्यामकडे जात्ये. त्याचा हात धरत्ये. ]

**मीरा**—व्हायचं काय ? पाय घसरला !

[ मोहन आणि कला एकमेकाकडे बघतात, मीरा आडव्या नजरेनें त्यांच्याकडे बघत्ये आणि स्वतःशीच हांसत्ये; श्यामला घेऊन ती आंतल्या भागांत जात्ये. त्याला पलंगावर बसवल्ये. कला जायला निघण्यासाठीं चुळबूळ करूं लागल्ये. ]

**मोहन**—( तिला डोळयानें खुणावून )-जाऊं नकोस, तिला संशय येईल.

**मीरा**—( आंतून ) कलाताई—

**कला**—आल्ये हं !

[ कला आंत जात्ये. मोहन विमनस्क स्थितींत सिगारेट काढून पेटवूं लागतो, मग आठवण झाल्यासारखें करून काडी विझवून फेकतो. सिगारेट चुरगळून टाकतो. ]

**मोहन**—डॅम् इट् !

[ श्यामचा ओरडण्याचा आवाज येतो. ]

**श्याम**—( आंतून ओरडून ) दुखतोयना ?

[ कला श्यामला हातानीं धरून चालवीत बाहेर आणत्ये. मागून मीरा पट्टी-बँडेज व इतर साहित्य घेऊन येत्ये. ]

**मोहन**—फार लागलं कां ग त्याला ? बघूं !

[ श्यामला कोचावर बसवतो व त्याचा पाय आपल्या मांडीवर घेतो. पाया-वरून हात फिरवतां क्षणींच श्याम विव्हळतो ]

**श्याम**—आई ग, दुखतो ना ?

**मोहन**—हें बघ, तुझं तें डॉक्टरी ज्ञान राहूं दे बाजूला, डॉक्टरनांच बोलावलं पाहिजे.

**मीरा**—कांहीं नको. नाहीं कांहो कलाताई ?

**मोहन**—हें बघ कला, तूंच—( थांबतो ) मिस् चौधरी, तुम्हींच करा पाहूं फोन !–( कला ओशाळी होत्ये )

**मीरा**—( रोखानें ) मिस् चौधरींनां डॉक्टरांचा नंबर देखील सांगून टाकलात वाटतं !–थांबा मीच करत्ये.

[ फोन करायला सुरुवात करत्ये, रिसीव्हर कानाशी लावत्ये. ]

**श्याम**—बाबा हो, स्टेशन जवळ कीं नाहीं एक भिकारीण रडत होती, पैसा मागत होती—

**मीरा**—हॅलो, डॉक्टर कां ?–तसं कांहीं विशेष नाहीं हो–जरा पाय मुरग-ळला आहे.–श्यामचा–बघा येऊन–सवडीनं या ना, चार वाजतां आलांत तरी चालेल–आहेत ना ! ( रिसीव्हर ठेवत्ये ) घ्या, डॉक्टर हवेत, तर डॉक्टर येतील.

**कला**—बरं. मीराताई येत्ये मी !

**मीरा**—( श्यामचे बूट काढीत ) माझा हो कशाला निरोप घेतां ? यांचा घ्या. झालं कां तुमचं काम ?

**कला**—तसं कांहीं विशेष नव्हतं.

**मीरा**—आणि असतं तर तुम्हीं गेलांच नसतां !

**कला**—ही मी आतांच आल्ये होत्ये—

**मीरा**—तर काय, मी उतरल्ये नी तुम्हीं आलांत ! पाहिलं होतं मी तुम्हांला !

**श्याम**—नाहीं, मी पाहिलं ग मावशी ! तूं येत होतीस—

**मीरा**—हें काय ? एकेरी नांवानं बोलावं कां रे श्याम !

**कला**—बोलूं द्या हो, त्याचं नी माझं परवां तसं ठरलं होतं.

**मीरा**—नी यांचं तुमचं कधीं आज ठरलं वाटतं ?

**मोहन**—काय ठरलं आमचं ?

**मीरा**—असंच एकेरी नांवाचं !—

**श्याम**—मावशी, बस ना ग ! जाऊं नकोस ना ? माझा पाय बांधून देणार होतीस ना तूं ?

**मीरा**—माय मरो नी मावशी उरो, ही म्हण माहीत आहे कां रे तुला श्याम ?

**कला**—( चुळबूळ ) मला उशीर होतोय.

**मीरा**—खरंच तुम्हांला उशीर झाला ! फार उशीरा ओळख झाली तुमची यांची !

**श्याम**—मावशी, तूं कबूल केलं होतंस पट्टी बांधून द्यायचं ?

**मोहन**—मीरा, तुझं बोलणंच समजत नाहीं. तुला संशय आला आहे कां कसला ?

**मीरा**—बघा हो कलाताई, यांच्या मनांत भांडायचं आलेलं आहे, ऊठ सूठ संशय घेऊन कां संसार चालत असतो ?

**श्याम**—बाबा हो, ही आई कीं नाहीं मघा देखील माझ्यावर रागावली—त्या भिकारणीच्याजवळ कीं नाहीं एक लहानसं बाळ होतं.

**मीरा**—कलाताई, मला नाहीं त्या भिकारणीची कींव आली. सोन्यासारखा तो निष्पाप नाजुक जीव हंसत खिदळत होता. नी ती नकली आक्रोश करून स्वतःबद्दल करुणा निर्माण करीत होती.

**कला**—पाहिली मी तिला. कायग बाई तिचा अवतार–किळस येत्ये अगदीं ! जगांत सौंदर्य आणि कुरूपपणा एकमेकांच्या शेजारांत असलेला मला पहावत नाहीं.

**श्याम**—बाबा हो, तिच्या त्या मुलाकडे मागं वळून पाहिलं, नी पाय घसरून पडलों मी !

[ मोहन त्याच्या पायाला पट्टी गुंडाळूं लागतो. ]

**मीरा**—तिच्यांत कुरूपपणा नव्हता. ओंगळ दैन्य होतं. ती स्वतःच्या पोटासाठीं जगापुढं पदर पसरीत होती; पण स्वतःच्या पदराआड एका नव्या जीवाचं पोषण करण्याचं सामर्थ्य वागवीत होती.

**कला**—श्याम—झाली बरं आतां पट्टी बांधून! मी संध्याकाळीं येईन हं तुझं बघायला!

**मीरा**—( सहज भावानें ) आमच्या घरीं यायला निमित्त नकोत, नुसत्याच आलांत तरी चालेल!—नाहीं कां रे श्याम?—

[ कला व मोहन एकमेकाकडे बघतात. मोहन श्यामचा पाय खाली ठेवतो. मीरा त्याला उठून उभी करत्ये. ]

**श्याम**—मला आंत ने ना ग मावशी!

**मीरा**—जाऊं दे हं त्यांना, येवढा लळा उपयोगी नाहीं. खरं की नाहीं कलाताई?

[ त्याला चालवीत आंत नेत्ये, त्यांच्याकडे मोहन व कला बघतात. ]

**कला**—यांचं काय तें कळतच नाहीं. मी संध्याकाळीं येऊं नकोना?

**मोहन**—कळवीन मी तुला. मला तिचं मनोगतच कळत नाहीं.

**कला**—मला वाटतं, त्यांना संशय आला असावा. जाऊं—

[ मानेनेंच त्याला विचारत्ये, तो मानेनेच होकार देतो. कला जात्ये, मोहन दाराकडे बघत राहतो. दार लावून परत येतो व कोचावर धाडकन आंग टाकतो. मीरा येत्ये. ]

**मीरा**—कलाताई गेल्या वाटतं?

**मोहन**—( तुटकपणानें ) होय. आतांच गेल्या त्या!

**मीरा**—त्यांच्याबद्दल तुम्हीं एकेरी बोललांत, तरी मला कांहींही वाटायचं नाहीं!

**मोहन**—( ताडकन उठून ) म्हणजे? तुला म्हणायचं तरी काय आहे? तुला संशय वाटतो माझा?

**मीरा**—कसला संशय घेऊं मी तुमचा?

**मोहन**—तूं आतांपर्यंत वागलीस, ती किती चमत्कारिकपणानं?

**मीरा**—काय केलं मी?

**मोहन**—इथं तुझ्या अपरोक्ष कला आली—

**मीरा**—आलांत पुन्हां तुम्हीं त्यांच्या बाबतींत एकेरीवर!—तुम्हांला काय वाटतं? तिला बघून माझा जळफळाट व्हायला हवा होता? मी रागावून सारं घर डोक्यावर घ्यायचं होतं!—समजा, आतां संध्याकाळीं डॉक्टर आले नीं तुम्हीं मग बाहेरून आलांत, घ्याल का तुम्हीं माझा संशय?

**मोहन**—( नरमून ) मला वाटलं तुला माझा संशय आला असेल!

**मीरा**—तिला तुमची ओढ लागली याबद्दल मला मुळी संशयच नाहीं.

**मोहन**—खोटा आहे हा तुझा संशय!

**मीरा**—( समजूतदारपणानें ) मी म्हणत्ये पुरे आतां हें रामायण! झोंपून उठलांत नी तसेच बसलांत?–जा पाहूं, गडी आणखी दोन दिवस येणार नाहीं. कपडे भिजवायचे नाहीत.

**मोहन**—मीरा, मला राहून राहून वाटतं–तूं हंशावारी नेत्येस, पण तुझ्या मनांत संशयानं घर घेतलेलं आहे.

**मीरा**—रिकाम्या मनांत ही असलीं घरटीं बांधण्यांत येतात.

**मोहन**—विश्वास आहे तुझा माझ्यावर?

**मीरा**—अगदीं लिहून देऊं कां? खात्री आहे माझी. माझा मोहन असले पन्नास पंजाबी पोशाख त्याच्या पायाशी येऊन पडले, तरी मला सोडून जायचा नाहीं. झालं!—

[ त्याचा हात धरून आंत घेऊन जात्ये. श्याम लंगडत लंगडत बाहेर येतो, त्यानें काठीचा आधार घेतलेला आहे. ]

**श्याम**—बेबी बेबी डू नॉट क्राय–ममी मेक्स चिल्ड्रेन क्राय,
डॅडी कॅचेस बटरफ्लाय–बेबी बेबी डू नॉट क्राय!

( टेबलावरचे एक वर्तमान पत्र उचलतो. मग दुसरे चाळतो. )–आई, माझं तें पुस्तक कुठाय ग?

( मीरा बाहेर येत्ये. )

**मीरा**—आलास तूं इथं. जरा स्वस्थ पडशील म्हटलं तर तें कसं होईल?

**श्याम**—मला नाहीं करमत पडल्या पडल्या.

**मीरा**—लेखकाचाच मुलगा कीं नाहीं!

**श्याम**—दे ना ग तें पुस्तक.

**मीरा**—शोध गडे तूंच!–नाहींतर त्यांना शोधून माग! मला माझीं कामं आहेत.

**श्याम**—असं ग काय करत्येस? दे ना!

**मीरा**—भारीच हटवादी आहेस तूं!

**श्याम**—बघ, त्या ड्रॉवरमध्यें ठेवलं होतं मी.

**मीरा**—त्यांच्या टेबलाशी लुडबुड करू नकोस म्हणून सांगितलं होतं ना? त्यांचे कामाचे कागद असतात.

**श्याम**—पुन्हां नाहीं करणार, झालं.

[ मीरा एक ड्रावर उघडत्ये. त्यांत सांपडत नाहीं, मग दुसरा उघडत्ये, मग तिसरा. पत्रें ठेवलेल्या ड्रॉवरला किल्ली तशीच असत्ये. ड्रॉवर उघडाच असतो. ती उघडून बघत्ये. ]

**मीरा**—ही कसलीं पत्र अशीच टाकून दिलीं यानीं ?

[ ती एकेक पत्र न बघतांच ठेऊं लागते. इतक्यांत मोहन खांद्यावर टॉवेल टाकून येतो. ]

**मोहन**—( दचकून ) कशाला उघडलास तो ड्रॉवर !

**मीरा**—उघडाच होता तो !

**मोहन**—( संशयानें ) तीं पत्रं वाचण्यासाठीं मुद्दाम उघडलास तूं !

**मीरा**—( दुर्लक्ष करीत ) कुठली पत्रं ! मी वाचलीं नाहींत ती !

**मोहनः**—खोटं बोलूं नकोस, आण तीं पत्रं ( तिच्यावर झडपतो )

**मीरा**—( निर्धारानें ) आरोपच करीत असाल तर देणार नाहीं. कुणाचीं आहेत हें सांगा आधीं !

**मोहन**—( चवताळून ) मीरा, आधीं तीं पत्र दे—!

[ श्याम उठून उभा राहतो. आळीपाळीनें दोघांच्याकडे बघत असतो. त्याला हें कांहींच कळत नाहीं ]

**मीरा**—( निर्धारानें ) सांगितल्याशिवाय मिळायचीं नाहींत म्हटलंना ! ( पत्रें घट्ट धरून ठेवत्ये. )

**मोहन**—( ओरडून ) आणत्येस कीं नाहीं ?

[ तिच्या हातातलीं पत्रें हात पिरगळून घेण्याचा प्रयत्न करतो, श्याम पुढें सरतो. ]

**मीरा**—देणार नाहीं, आं ऽऽ ( वेदनेनें ओरडत्ये )

**श्याम**—बदमाश साले, माझ्या आईला मारतात !

[ मोहनच्या हातावर काठीनें फटका मारतो आणि तोल जाऊन पडतो. ]

**मीरा**—( ओरडत्ये ) श्याम-

[ मोहन श्यामला उचलूं लागतो. तो दूर लोटतो ]

**मोहन**—मीरा, क्षमा कर.

**मीरा**—( त्याच्याकडे लक्ष न देतां ) श्याम, लागलं तुला ?

**श्याम**—आई, तुला बाबानीं कां ग मारलं ?

**मोहन**—मीरा, नाहक संशय घेत्येस तूं माझा ?

**मीरा**—( थंडपणानें ) येवढा हा अनुभव आल्यावर देखील ?–चल श्याम. आधीं पलंगावर पड बघूं.

**मोहन**—संशयाचे सेतु बांधून स्त्री आपला संसार उजाड करून टाकत्ये.

**मीरा**—( श्यामला आंत नेत ) तुमच्यासारखे एकपत्नीव्रती राम असल्यावर संसाराचं रामायण झालं नाहीं तरच नवल !

**मोहन**—( तिच्या पाठोपाठ जात ) तुझा माझ्यावर विश्वास नाहीं ?

**मीरा**—विश्वासाचं विश्व केव्हांच नाश पावलं !

**मोहन**—तीं माझीं खासगी पत्रं होतीं. मला वाटलं तूं—

[ तो पलंगाजवळ येतो. तेव्हां मीरा उठून उभी राहत्ये ]

**मीरा**—थांबा आंत येऊं नका. तुमच्या विषारी श्वासानं इथलं निर्मळ वातावरण नासवूं नका.

**श्याम**—बाबा, उठा–माझ्या आईला मारलंत तुम्हीं !

**मीरा**—पाहिलंत,–अपत्यवत्सल पित्यासाठीं हे आमचं प्रीतीचं देवघर आहे. प्रेमळ पतीसाठीं हें विसाव्याचं स्थान आहे. विश्वासू सोबत्यासाठीं हा इथं प्रीतीचा आसरा आहे. या इथं बसण्याचा हक्क तुम्हीं गमावलात,–या इथं परके झालांत !—

[ त्याचा पलंग खसकन बाजूला ओढत्ये आणि श्याम निजला त्या पलंगावर मान टाकून ढसढसा रडायला सुरुवात करत्ये. श्याम तिच्या पाठीवरून हात फिरवतो. मोहन बाहेर येतो, टेबलावरची सिगारेट पेटवतो. ]



# अंक तिसरा

[ **स्थळ**—दुसऱ्या अंकाचेच, कॅलेंडरमध्यें तारीख सात, दुपारची वेळ. घड्याळांत ठणठण चारचे ठोके पडतात. मोहन बाहेर जाण्याच्या तयारीत असतो, पोशाख सूट घातलेला. ]

**मोहन**—श्याम–?

**श्याम**—( बाहेरून धांवत येतो )–काय हो बाबा.

**मोहन**—आई कुठं गेली रे?

**श्याम**—सांगितलं नाहीं तिनं तुम्हांला ?

**मोहन**—तुला आहे ना ठाऊक ?

**श्याम**—पाळंदे काकूबरोबर गेली ती दुकानांत ?

**मोहन**—हा पांड्या येणार तरी किती दिवसानं ? कोण जाणे ?

**श्याम**—त्याचं लग्न आहे बाबा, म्हणून गेला तो.

**मोहन**—( चिडून ) लग्न, लग्न–लग्न !

**श्याम**—बाबा, तुम्ही आईशी अबोला धरलांत ?

**मोहन**—तूं देखील धरला होतास ना माझ्याशी ?

**श्याम**—पण तुम्हीं आईला मारलं होतं !

**मोहन**—नी तूं मला मारलंस तें ?

**श्याम**—पण बाबा, खरं सांगू–तुम्हीं बोललां नाहींत दोन दिवस ! मला इतकं वाईट वाटत होतं, पाय दुखत होता म्हणून, नाहीं तर इथं आलो असतो आणि झोंपलो असतो तुमच्या जवळ !

**मोहन**—तूं आतां मोठा झाला आहेस श्याम !

**श्याम**—मावशी असंच म्हणाली होती.

**मोहन**—मावशी ?

**श्याम**—कला मावशी !

**मोहन**—कला ? कुठं भेटली ती तुला ?

[ दारावरची घंटा वाजत्ये. दोघेहि तिकडे पहातात ]

**श्याम**—( हळूंच ) बाबा, सांगा बरं, कोण असेल तें ?

**मोहन**—आणखी कोण ? मीरा—

**श्याम**—चुकलं, बघा कोणतें !

[ दार उघडतो, कला येत्ये. पोशाख वैशिष्टयपूर्ण उघडे दंड असलेलें ब्लाऊज, डोक्याला रेशमी मफलर ! ]

**मोहन**—( आश्चर्यानें ) कोण, कला ? तूं कशी इथं या वेळीं ?

**कला**—( श्यामकडे बघत )-बोलावणं आलं होतं मला मुद्दाम !

**मोहन**—कुणाचं ?

**कला**—( लडिवाळपणानें ) कुणाचं रे श्याम ?

**मोहन**—श्यामला काय विचारत्येस ?

**श्याम**—बाबा हो, आई म्हणाली-" मावशीला सांग, बाबानीं बोलावलं म्हणून ! "

**मोहन**—आणि तूं गेलास ? मला सांगितलं नाहींस तें !

**श्याम**—आतां सांगतोय ना ?

**कला**—मीराताई कुठं आहेत ?

**मोहन**—श्याम. पळ, आईला बोलावून आण !

**श्याम**—सांगितलंच होतं आईनं मला, मावशी आली कीं मीं तिला नाहीं तरी बोलावणारचं होतो. आतां येतो मी मावशी !

[ श्याम जातो. मोहन दाराला आंतून कडी लावायला जातो. कला त्याचा हात धरत्ये ]

**कला**—कडी नाहीं लावायची ! मीरानं कसला तरी डाव रचलेला दिसतो.

**मोहन**—दिसतंय खरं, पण मला याची कांहींच माहिती नव्हती.

**कला**—तुमचा अबोला अजून आहेच कां चालू ?

**मोहन**—तुला सांगितला, अगदीं तसाच ! मोजक्या शब्दांत बोलत्ये ती माझ्याशी !

**कला**—अशा वागणूकीनं तर कोणत्याहि पुरुषाला घर नकोसं होईल.

**मोहन**—आणि खरंच झालंय मला ! एकदां वाटतं, रात्रीं उठावं, नी जावं पळून या घरांतून !

**कला**—तेव्हां मागं वळून पाहिलंस, तर तुझ्या पावलावर माझी पावलं उमटलेलीं दिसतील तुला.

**मोहन**—पाठलाग करशील माझा ?

**कला**—नाहीं बरं, साथ द्यायला तुला !

**मोहन**—देशील याची खात्री आहे मला ! पण–पण–विवाहानं बांधलेला मी–तुला माझ्यातच काय असं आढळलं ?—

**कला**—मोहन कसं रे सांगू तुला ?–कितीदां सांगू रे तुला ? आम्हां स्त्रियाचं जिणं किती परस्वाधीन झालेलं आहे आजच्या काळांत ! एकीकडे सारे पुरुष, सारीं समाज नियंत्रणं !–तरुणांनीं नवमतवादाच्या घोषणा कराव्यात, सर्वच बाबतींत स्वातंत्र्याचा पुरस्कार करावा आणि आमचा प्रश्न मात्र अधिकाधिक बिकट करावा; असं चाललंय ! स्त्रियांचे प्रतिनिधी म्हणवणारे साहित्यिक आणि समाजशास्त्रवेत्ते आम्हांला लग्न करूं नका म्हणून सांगतात, पुरुषापासून दोन हात दूर रहायला सांगतात, त्यांच्याशीं आपल्या स्वातंत्र्यासाठीं दोन हात करायला सांगतात. मग आम्हीं तरुणी तशाच हुरळून स्वातंत्र्याच्या कांचनमृगामागं धावूं लागतों, आणि—

**मोहन**—आणि शेवटीं पदरांत पडतो मोहन असंच ना ?

**कला**—एखादीच माझ्यासारखी भाग्यवान् ! नाहींतर मग त्या तरुणींच्या कपाळीं या जगांत वनवासच वनवास !

**मोहन**—त्यांना स्वतःचा जोडीदार निवडता येत नाहीं म्हणून असं होतं.

**कला**—असेल, असंहि असेल. ज्यावेळीं आम्हीं लहान असतो, तेव्हां हे स्त्री शिक्षणाचे कैवारी आमच्या शिक्षणासाठीं आम्हांला अविवाहित ठेवतात. आम्हांला शिकवून शहाणं करतात. आणि मग जिवाचा जोडीदार निवडण्याचं शहाणपण आमच्या आंगी आलं म्हणजे आम्हीं निवडलेल्या जोडीदाराचं कधीं कधीं लग्न झालेलं असतं ! यांत आमचा काय बरं दोष ?

**मोहन**—मीरा येईल इतक्यांत, तिनं मुद्दाम तुला बोलावलं आहे, तेव्हां तिचं मनोगत कळेलच–तुला ! सांगितल्या शिवायच तिला सारं कळलेलं दिसतं ! मला बाहेर जायचं होतं. रेडियोवर भाषण आहे माझं आज, तेव्हां जरा दुसरीं कामं आटपायचीं होतीं. पण आतां जाणार नाहीं मी. जवळच बसतो डॉक्टरांच्याकडे. सांग मीराला–मी तिथं आहे म्हणून !

**कला**—ती माझ्याशी भांडणार कां आहे ?

**मोहन**—मला नाहीं तसं वाटत ! पण भितीच वाटत असेल तिची तर थांबतो मी !–नाहीं तर तूं देखील चल !

**कला**—( निश्चयानें ) नाहीं, तिनं मला बोलावलेलं आहे.

**मोहन**—(टिंगल करीत) बघ, कांहीं झालं तर आहेच मी डॉक्टरांच्या-कडे. तिथूनच अंब्युलन्स गाडी पाठवून देईन !

[ तिच्या गालावर चापटी मारतो, श्याम दार उघडून येतो ]

**श्याम**—मावशी, आलीच बघ आई ! अन् बाबा हो–आई म्हणत्ये, " आम्हां बायकांना निवांत बोलूं द्या " घरीं रहायचं नाहीं तुम्हीं !

**मोहन**—( कलेकडे पहात )–श्याम, मावशीला सांभाळशील ना तूं ?

**श्याम**—तुम्हीं जा ना आधीं.

[ त्याचा कोट धरून बाहेर काढतो, मोहन जातो, श्याम आंतून दार लावतो. ]

**कला**—मीराताई, आणखी काय म्हणत होत्या रे !

**श्याम**—आई म्हणत होती, आतां कीनई तुझ्या मावशीचं लगीन करायचं आहे.—

**कला**—( आश्चर्यानें ) असं म्हणत होत्या त्या ?

**श्याम**—होय, काल मला ती रामाची गोष्ट सांगत होती ना ? तेव्ह म्हणाली असं—

**कला**—तुला माहीत नव्हती रामाची गोष्ट ?

**श्याम**—तशी होतीग, पण आई सांगत्ये ना, तेव्हां बघ कसं रडूं येतं ?

**कला**—रडण्यासारखं काय आहे त्यांत ?

**श्याम**—राम जेव्हां सीतेला जंगलात टाकून देतो ना ? तेव्हां बघ मला रडूं आलं; सीतेच्या मुलानीं जेव्हां धनुष्यबाण घेऊन रामाचा घोडा पळवला, तेव्हां वाटलं मी देखील असंच केलं असतं !

[ घंटा वाजत्ये, श्याम जाऊन दार उघडतो, मीरा येत्ये.–बाहेर पाटी-वाल्याशी बोलते. ]

**मीरा**—त्या तिथं ठेव !–ही पावली घे, झालं. जा !

[ दार बंद झाल्याचा आवाज, श्याम व मीरा आंत येतात, कला सोफ्यावर बसलेलीच असत्ये ]

**मीरा**—काय, आलांत! कलाताई, मी आतां अशी येत्ये हं! (आंत जात्ये)

**कला**—श्याम, मीराताई माझ्याशी भांडणार आहेत कां रे?

**श्याम**—मुळींच नाहीं. मला जेव्हां तुझ्याकडे पाठवलंना? तेव्हां ती म्हणाली होती, "आपल्या मावशीला घेऊन ये बसायला!"—खरंच मावशी, बाबांशी मी भांडलो, त्यानंतर तूं कधींच आली नाहींस ग आमच्या घरी! मला सांगितलं होतंस, 'संध्याकाळीं येईन-'

**कला**—पण मग वाटलं, मीराताईना आवडायचं नाहीं ते!

**श्याम**—म्हणूनच आज सकाळीं तिनं मुद्दाम पाठवलं बोलवायला!

**कला**—श्याम,—श्याम माझ्या एका प्रश्नाचं उत्तर देशील?

**श्याम**—मला माहीत असेल तर देईन मी!

**कला**—समज, मी तुला विचारलं-( थांबत्ये. )

**श्याम**—( उत्सुकतेनें ) विचार तरी!

**कला**—( पवित्रा बदलून ) मी तुला आवडत्ये कां रे?

**श्याम**—( प्रांजलपणानें ) आवडत्येस तर!

**कला**—मीराताई आवडतात तश्शी?

**श्याम**—( विचारांत पडला बेटा ) तश्शी?

**कला**—नाहींना आवडत तशी?

**श्याम**—( निर्णय घेतला ) आवडत्येस तर!

**कला**—मग समज, मी तुझी आई झाल्ये तर?

**श्याम**—( विस्मयानें ) माझी आई?

**कला**—होय तुझीच?

**श्याम**—चल. कांहीं तरीच विचारत्येस तूं! दोन आया असतात वाटतं कधीं?

**कला**—हेंच कां माझ्या प्रश्नाचं उत्तर?

**श्याम**—असा प्रश्न विचारतात वाटतं कधीं? मी तुझ्या पोटीं जन्म कसा ग घेऊं शकेन पुन्हा!

**कला**—रामाला नव्हत्या कां तीन आया?

**श्याम**—सावत्र आई होय? नाहीं मावशी, तुला नाहीं जमायचें ते! तूं कैकयी सारखी दुष्ट कशी ग होशील? कांहीं तरीच!

**कला**—सावत्र आया दुष्ट असतातच कां रे ?

**श्याम**—पण, काय ग मावशी, आधीं मुळीं दशरथानं लग्नच कां केलं ग ?

**कला**—कैकयी त्याच्या कामात मदत करायची. त्याच्या रथाचं चाक ऐन लढाईत तिनं सांवरून धरलं होतं !

**श्याम**—तें लग्न झाल्यावर ! पण आधीं मुळीं लग्नच कां केलं ?

[ मीरा सरबताचे पेले घेऊन येत्ये, दाराशीच उभी राहत्ये ]

**कला**—कैकयी त्याला आवडली म्हणून !

**श्याम**—मी सांगू–कां केलं तें ? सूदननं सांगितलं मला !

**कला**—सांग बरं ?

**श्याम**—दशरथ हा कींनई राजा होता. त्याला उद्योग नव्हता म्हणून ?

[ मीरा पुढें येत्ये. सरबताचे पेले ठेवत्ये ]

**मीरा**—मावशीचं मन जिंकायचा विचार आहे वाटतं श्यामचा ?

**कला**—मला अगदीं पहिल्या दिवसापासून आवडला तो ! वयाच्या मानानं किती शहाणा आहे पण ?

**मीरा**—बापाचे सगळे गुण उतरले आहेत त्याच्यांत !

**कला**—मीराताई, तुमच्या श्यामची तुम्हीं दृष्ट काढा आज !

**मीरा**—दृष्ट काढायला आतां तो लहान कां आहे ? चांगला घोड्या झाला आहे. ( पेला पुढें करीत )–घ्याना–( कला पेला घेत्ये )–तुमचा दृष्ट नी नजर याच्यावर विश्वास आहे वाटतं ?

**कला**—( पेला श्यामला देत ) तसा विश्वास नाहीं हो, पण वाटतं कधींकधीं !

**मीरा**—( दुसरा पेला तिला देत ) हेंच तें–बायकांचा आंधळा विश्वास म्हणा, नाहीं तर अंतरीचं चाळवलेलं आईपण म्हणा–तें हेच !

**कला**—(ओठाजवळ नेलेला पेला बाजूला सारून) चाळवलेलं आईपण ?

**मीरा**—होय, प्रत्येक स्त्री जन्मतःच सुप्त मातृत्व आपल्या देहांत धारण करून येत्ये. तिच्या देहांतलं तें निजलेलं आईपण केव्हांना केव्हां तरी तसं चाळवल्या जातं.

**कला**—असं वाटतं तुम्हांला मीराताई !

**मीरा**—मुद्दाम याच विषयाची चर्चा करायला बोलावलं होतं मी ?

**कला**—म्हणजे ? ( पेला खाली ठेवत्ये. )

**मीरा**—तें सरबत घ्याना आधीं ! श्याम, झालं ना तुझं पिणं ?

**श्याम**—( बिचारा ) पण आणखी मागितलं कां ग मी !

**मीरा**—हवंय कां तुला ? ( श्याम नकारार्थी मान हालवतो ) नाहींना? मग कींनई खेळायला जा बरं ! आम्हीं मोठीं माणसं बोलतो त्यांत लक्ष घालायचं नाहीं. सूदनकडे जातोस ना खेळायला ?

**श्याम**—होय-( कलेला ) बघ मावशी, तूं मला सिनेमाला न्यायचं कबूल केलं होतंस ?

**कला**—( आश्वासनपूर्वक ) होय ना, मी नाहीं म्हटलं कां ?

**श्याम**—मग तुमचं बोलणं संपल्यावर येईन हं मी !–

[ श्याम जातो ]

**कला**—( गंमतीनें ) मुलानं बापाला घालवलं, आई मुलाला घालवत्ये.

**मीरा**—नी मावशी आईला घालवायला निघालेली आहे.

**कला**—( उठून ) म्हणजे ? याचा अर्थ मीराताई ?

**मीरा**—(शब्द परजून ) बसा तरी ! सांगत्ये ना ?–बघा कलाताई. तुमचं मोहनशी लग्न होणं शक्य नाहीं.

**कला**—अस्सं, याच्यासाठींच बोलावलंत तर तुम्हीं मला ?

**मीरा**—होय याच्यासाठींच !–मला माझ्या संसारावर आलेलं तुमच्या प्रीतीचं सावट दूर करायलाच हवं !

**कला**—( हांसून ) भांडण करून ?

**मीरा**—तो जुना काळ आतां संपला ! तेव्हां एका स्त्रीसाठीं दोन पुरुष एकमेकाशी रानदांडगेपणानं झुंजत, जिंकणाराबरोबर त्या दुर्दैवी जीवाला जावं लागत असे.

**कला**—मग आतां आपण एकमेकीच्या झिंज्या उपटायच्या कां ? मला वाटतं, त्यात तुम्हींच; जिंकाल धष्टपुष्ट आहांत तुम्ही. माझ्यापेक्षां–मग मोहनला सक्तीनं तुमच्या बरोबर संसार करावा लागेल.

**मीरा**—मला वाटलं, मोहनबद्दल तुम्हीं एकदम नाकबूल व्हाल. पण चोरट्या प्रेमाचा तुम्हांला कंटाळा आलेला दिसतो.

**कला**—माझं मोहनवर प्रेम आहे, याचे बरेचसे पुरावे गोळा केलेले दिसतात तुम्हीं ?

**मीरा**—मुद्दाम तसं करायची गरजच पडली नाहीं.

**कला**—पण मी पुन्हां सांगत्ये, माझं मोहनवर प्रेम आहे.

**मीरा**—माझ्या मोहनवर तुमचं प्रेम बसलं-याबद्दल मला काय वाटत असेल, अशी तुमची कल्पना आहे ?

**कला**—मत्सरानं जळत आहांत, हें तर दिसतंच !

**मीरा**—चुकलांत, कलाताई ! अभिमान वाटतो मला !

**कला**—अभिमान ? यात कसला अभिमान वाटायचा !

**मीरा**—वाटेल त्या पुरुषावर प्रेम करायचा वाटेल त्या स्त्रीला हक्क आहे.

**कला**—हक्क कसला ? मनाची उत्कट ओढ असते ती !

**मीरा**—ओढ म्हणा पाहिजे तर ! ती ओढ व्हायला पुरुषाचं व्यक्तिमत्व असामान्य असायला हवं असतं; हें तरी खरं ना ?

**कला**—मोहनवरून कोणीहि आपला जीव ओंवाळून टाकील.

**मीरा**—कोणीही आपलं पातिव्रत्य ओंवाळून टाकावं, असा राजबिंडा आहे माझा मोहन.

**कला**—मग तुम्हांला अभिमान वाटण्यासारखं काय आहे त्याच्यात ?

**मीरा**—असा मोहन, माझा पति आहे. माझ्या मुलाचा पिता आहे.

**कला**—( उपहासपूर्वक ) पति ?–पिता ?–तुमच्याच कां–तुमच्याऐवजीं दुसरी एखादी स्त्री असती तर तिच्याही मुलाचा तो पिता झाला असता.

**मीरा**—पण झाला कां ?

**कला**—योगायोगानं तुमचं त्याच्याशी लग्न झालं ?

**मीरा**—योगायोग नव्हता; जीवनाच्या ओढीनं एकत्र आलेल्या दोन जीवांचा संयोग होता तो !

**कला**—जीवांचा म्हणूं नका, देहांचा म्हणा पाहिजे तर !

**मीरा**—निसर्गाच्या नियमाला आम्हीं मोठमोठीं नांवं देतो. जीवाशिवाचा संयोग म्हणतो, प्रेम म्हणतो.

**कला**—असेल, तसंही असेल, पण माझं मोहनवर प्रेम आहे.

**मीरा**—सांगितलं ना, त्याचा अभिमान वाटतो मला म्हणून ?

**कला**—पण तुमचा मोहनवर काय हक्क आहे ?

**मीरा**—हक्काचा प्रश्न बरा विचारलांत ! तुमचा मोहनवर हक्क आहे, असं का तुम्हांला म्हणायचं आहे ? तुमच्या मुलाचा पिता आहे कां तो !

**कला**—माझ्या मुलाचा पिता ! ( उठून उभी राहत्ये ) मीराताई, माझा अपमान करायलाच कां इथं बोलावलंत तुम्हीं ?

**मीरा**—( शांतपणानें ) यांत कसला अपमान ! तुम्हीं माता व्हायला नालायक आहांत कलाताई ? तुम्हांला मातृत्व नको आहे ?

**कला**—मला मूल नको आहे.

**मीरा**—मग तुम्हांला या जगांत सुख मिळायचं नाहीं.

**कला**—मला आहे ठाऊक, माझं सुख कसं मिळवायचं तें !

**मीरा**—पण त्या सुखाला पूर्णविराम द्यायचा नसेल तर स्त्रीनं आई झालंच पाहिजे.

**कला**—जिच्या हातीं पाळण्याची दोरी, तीच देशातें उद्धारी, ही म्हण नाहीं सांगितलीत अजून !

**मीरा**—म्हण सांगत नाहीं, पण माहिती सांगत्ये. जुन्या काळीं हातीं पाळण्याची दोरी आली नाहीं कीं, बायकांना फांसाची दोरी शोधावी लागत असे.

**कला**—तुम्हीं बायका मातृत्वाच्या नांवाचा उदोउदो करून स्वतःची सोय करूं पाहतां.

**मीरा**—मातृत्व हा मुळीं निसर्गाचा नियमच आहे.

**कला**—निसर्गावर मानवानं अनेक विजय मिळवलेले आहेत.

**मीरा**—निसर्ग मानवांना खेळवील खेळवील आणि एखाद्या दिवशी फशी पाडील ! जगाच्या नित्यपणासाठीं निसर्गाला निर्मिती हवी, नियंत्रण नव्हें,–खच्चीकरण नव्हें. म्हणूनच स्त्री नी पुरुष मिळून संसाराची उभारणी करतात.

**कला**—ढोंग आहे हें ! मातृत्वाचा बडिवार माजवून स्त्रिया पुरुषावर आपला हक्क गाजवतात. पण त्यांना खरी इच्छा असते घर संसाराची—स्वतः-साठीं सुरक्षित उबदार घरटं राखून ठेवण्याची !

**मीरा**—हें मात्र तुम्हीं माझ्या मनासारखं बोललांत! कोणत्या कां वेगवेगळ्या वळणांनीं आपण स्त्रिया गेलोंत, तरी मूळ प्रश्नांवर एकमत होणारच आपलं!

**कला**—समजल्ये नाहीं मी तुमच्या बोलण्याचा अर्थ?

**मीरा**—स्त्रीचा संसार हा एखाद्या उबदार घरट्यासारखा असतो. पण त्या घरट्यांत-किती जण रहात असतील अशी तुमची कल्पना आहे? एका घरट्यांत दोन माद्या रहात नसतात कलाताई, पक्षाची रीत आहे ही! ऐन वादळांत देखील आपलं घरटं कोसळलं म्हणून, वाऱ्या पावसांतून आपले भिजलेले पंख हालवीत, कुठंतरी आसरा शोधणारी मादी निसर्गाचा नियम विसरत नाहीं. ती दुसऱ्यांच्या घरट्यांत शिरत नाहीं. एका घरट्यांत दोन माद्या आणण्याची पक्षाची रीत नाहीं.

**कला**—मीराताई, तुम्हांला तुमच्या संसाराचं घरटं शाबूत रहावं म्हणून काळजी लागलेली आहे. मला माझा संसार उभारायचा आहे. मला माझ्यासाठीं माझं उबदार घरटं बांधायचं आहे! तुम्ही नाहीं कां करणार मला यांत मदत?

**मीरा**—माझी कसली मदत तुम्हांला हवी? कलाताई, मला तुमची दया येत्ये. पण प्रश्न माझ्या स्वतःच्या सुरक्षितपणाचा आहे. मला माझ्या संसाराचा नाश होऊं द्यायचा नाहीं. संसाराच्या जाळ्यांत सांपडेला पुरुष त्यांतच कसा अधिकाधिक गुरफटून जाईल याची त्याच्या पत्नीनं काळजी घेतली पाहिजे.

**कला**—आकाशव्यापी गरुडाप्रमाणं मोहनचं जीवन आहे. त्याला देऊं शकाल तुम्हीं साथ?

**मीरा**—या देहानं मोहनसाठीं किती घाव सोसले हें सांगत बसत नाहीं मी तुमच्या जवळ! सांगायची इच्छा पण नाहीं. मोहनच्या गरुडभराऱ्यांच्या वेळीं मी त्यांच्या सोबतीला नसेन कदाचित! पण मला माहीत आहे. आकाशव्यापी गरुड देखील आपलं घरटं विसरत नाहीं; आपलीं पिलं विसरत नाहीं.

**कला**—त्या त्याच्या भरारीच्यावेळीं त्याला दुसरी तशीच भरारी मारणारी पक्षीण भेटली तर?

**मीरा**—याचं उत्तर मोहनलाच विचारूं केव्हां तरी! पण आत्तां सांगत्ये. तुम्हीं माझ्या संसाराचा नाश करूं नका. तुम्हीं मला मघा एक मागणं केलं, तें मी पुरवलं नाहीं; पण तुम्हीं मात्र माझं मागणं पुरवलंच पाहिजे.

**कला**—सांगितलं नाहीं तुमचा काय हक्क आहे मोहनवर तें?

**मीरा**—त्यांच्या मुलाची आई आहे मी!–आतांच नाहीं कां सांगितलं हें?

**कला**—आणि मीही तशीच झाल्ये तर?

**मीरा**—( गोंधळून ) तुम्हीं? तें शक्य नाहीं.

**कला**—कां बरं? नवरा पकडायचा असेल तर, बाईनं आधीं एकाद्या पुरुषावर पितृपदाची जबाबदारी टाकली पाहिजे; असाच तुमच्या म्हणण्याचा भावार्थ होता ना?

**मीरा**—पण तें शक्य नाहीं, मोहन?–नाहीं, तुम्हीं कांहीं तरीच सांगतां!

**कला**—विवाहित पुरुषाचा धोका पत्करणारी स्त्री कधींकधीं फशी पडेल, नाहीं असं नाहीं, पण मला मोहनची खात्री आहे.

**मीरा**—( ओरडून )–कला, खरं सांगत्येस तूं हें? तूं–तूं मोहनच्या मुलाची माता होणार आहेस?

**कला**—( गोड हंसून )–शेवटीं तुम्हीं देखील आलांत एकेरीवर मीराताई? आतां यापुढं अहो जाहोचे कृत्रिम उपचार बंद–ताई, माझ्या श्यामची आई तूं!

**मीरा**—नाहीं, माझा विश्वासच बसत नाहीं.

[ सोफ्यावर बसते. कला तिच्याजवळ जात्ये. ]

**कला**—कशावर विश्वास बसत नाहीं?

**मीरा**—विवाहित पुरुषाचा धोका पत्करला कीं कुणातरी एकीच्या संसाराचा नाश होतो याची तुला जाणीव नव्हती?

**कला**—जीवनांत पुष्कळदां धोके हे पत्करावेच लागतात.

**मीरा**—माझ्या संसारावर निखारे ठेवायला निघालीस तूं!

**कला**—तुझं मोहनवर प्रेम आहे ना ताई?

**मीरा**—माझ्या आतांपर्यंतच्या आयुष्यानं त्याचं उत्तर दिलेलं आहे.

**कला**—मग मोहनच्या सुखासाठीं तूं काय करशील ?

**मीरा**—माझ्या आतांपर्यंतच्या आयुष्यानं त्याचं उत्तर दिलेलं आहे.

**कला**—तुझं खरंच मोहनवर प्रेम आहे ?

**मीरा**—( क्षीण हास्य ) कला–माझं मोहनवरचं प्रेम म्हणजे घडी दो घडीचा उन्माद नव्हे. मी त्याची जन्माची सोबतीण आहे.

**कला**—कुणी दिली ही सोबत करून ?–देवानं ?–धर्मानं ?–कायद्यानं ? समाजानं ?–सांगना असं !–लग्नाच्या वेटोळयांत स्त्री पुरुषांना बांधून ठेवणाऱ्या या प्रगतिविरोधी––

**मीरा**—प्रगतिविरोधी म्हणे ! मग तूं तरी मोहनबरोबर लग्न करायला येवढी उतावीळ कां झालीस ?

**कला**—मला लग्न नको, मला मोहन हवा.

**मीरा**—कला, तूं तरुण आहेस; तुझा हा प्रीतीचा उन्माद आहे. माझं ऐक. प्रेमरसाची मेजवानी स्त्री पुरुष दोघं मिळून मिटक्या मारीत खातात–जेवण संपलं कीं पुरुष पानावरून उठून जातो, आणि मग खरकटं स्त्रीला सावडावं लागतं.

**कला**—म्हणूनच पुरुषाला स्त्री लग्नानं बांधून घेत्ये नाहीं ? तिचे बाहुपाश त्याला बांधायला दुबळे ठरतात, म्हणूनच ती त्याच्या भोंवती लग्नाचा पाश टाकत्ये ना ?

**मीरा**—मोहन आपल्याला साथ देईल असं वाटतं तुला ?

**कला**—त्याचं मी काय सांगू !

**मीरा**—पण मी सांगत्ये. ते मला साथ देत आले नी देतील. विश्वास आहे माझा त्यांच्यावर ! आमचं दोघांचं लग्न झालेलं आहे.

**कला**—एक प्रश्न विचारूं ताई ? समज, मोहनच्या ऐवजी दुसऱ्याच एखाद्या पुरुषाबरोबर तुझं लग्न झालं असतं तर ?

**मीरा**—तर काय ?

**कला**—तर काय केलं असतंस तूं ? आली असतीस मोहनवर हक्क सांगायला ?

**मीरा**—( उत्तर टाळून ) तूं काय केलं असतंस ?

**कला**—लग्नाची बंधनं तोडून मी मोहनच्या जवळ उभी राहिल्ये असत्ये.

**मीरा**—मोहननं केला असता तुझा स्वीकार ?

**कला**—परीक्षाच बघायची आहे कां ?

**मीरा**—तुझ्या माझ्यांत निवड करायची झाली तर मोहन कुणाची निवड करतील असं तुला वाटतं ?

**कला**—मोहनच देईल याचं उत्तर! बोलाव त्याला आतांच—होऊं दे एकदाचा निर्णय—

[ फोनवर जात्ये. कनेक्शन घेत्ये व रिसीव्हर कानाशी लावत्ये. ]

**मीरा**—कुठं आहे मोहन ?--

**कला**—मोहनला वाटत होतं तुझ्या माझ्यांत लढाई होईल—हॅलो, मोहन देसाईनां जरा फोनवर पाठवाल कां—?—मीराताई बोलावताहेत त्यांना—! ( मीरेला ) मोहनला वाटत होतं, तूं माझ्या झिंज्या उपटशील, तूं मला उभी फाडून खाशील, पण तूं समजूतदार आहेस ताई—( फोनवर ) मी कला—कांहीं झालं नाहीं, मैत्रिणी झालों आम्हीं !—एकदम यायला हवं तुम्हीं इथं ! ( रिसीव्हर ठेवत्ये )—आतां येईल मोहन !

**मीरा**—मोहन आतां येईल !—येऊं दे, पण माझी खात्री आहे. श्यामचे वडील त्याच्याच आईची निवड करतील !

**कला**—मुलगा, घर या पार्थीव बंधनानं पुरुष बांधला जातो, असं खरंच वाटतं तुला मीराताई ?

**मीरा**—पुरुषाचा पराक्रम आणि स्त्रीचं सर्वस्व यांच्यावर मुळीं घराची उभारणीच केलेली असते.

**कला**—पण तें चार भिंतीचं घर म्हणजे पुरुषाला तुरुंग वाटतां कामा नये.

**मीरा**—त्याला दाही दिशा मोकळ्या असायला हव्यात ?

**कला**—नाहीं, त्याला घरांत आपलेपणा वाटायला हवा ! दिवसभराचे कष्ट विसरायला लावण्याचं सामर्थ्य त्या घरांत असायला हवं. या चार दिवसांत मोहनची चाललेली वणवण पाहिलीस तूं मीराताई ? तूं जवळ जवळ त्यांना घराबाहेर पिटाळलंस !

**मीरा**—मला माझा संसार सुरक्षित राखायचा आहे !

**कला**—तूं तुझ्या संसाराचं पाहिलंस; पण मोहनच्या आकांक्षेकडे कधीं लक्ष्य दिलंस कां?

**मीरा**—मी त्यांना रुचकर जेवण देत्ये, त्यांच्या मनाला रंजवणारी बाल-मूर्ति दिली, त्यांना समाधान दिलं.

**कला**—समाधान! हें कसलं समाधान? स्वतःची चूल पेटवतांना त्याच्या पवित्र उर्मींचे निखारे केलेस! आपल्या मुलाचा पाळणा बांधलास आणि त्याच पाळण्याच्या दोरीनं नवऱ्याचा ध्येयवाद फांशी दिलास. त्याच्या लढवय्येपणाला लग्नाच्या बेडीनं बांधून टाकलंस!

**मीरा**—ती बेडी नव्हती, तें आश्वासन होतं. मोहननं लग्न केलं याचं कारण मी त्यांना जिंकून घेतलं होतं. ध्येयाचा बडिवार सांगू नकोस मला. ध्येयासाठीं करावा लागणारा त्याग करायची त्यांची तयारी नव्हती!

**कला**—त्यावेळचं त्याचं लढाऊ आयुष्यच साक्ष देईल याची! त्यावेळीं स्वार्थत्यागाची उत्सुकता त्याच्या रोमांरोमांतून नाचत होती.

**मीरा**—पण खरा त्याग करावा लागला मला. मोहनच्या हातात बेड्या पडल्या नव्हत्या, उलट एक संसार चालविण्यासाठीं—नव्हे जगविण्यासाठीं माझे हात बांधले होते मोहननं! मोहन तुरुंगात गेले, त्यांना कीर्ति मिळाली, नांव मिळालं, मला काय मिळालं? कोणतं श्रेय मला मिळालं? कोणतं प्रेय मला मिळालं? कला, खरा स्वार्थत्याग स्त्रीला करावा लागतो. खरे कष्ट तिला सहन करावे लागतात.

[दारावरची घंटा वाजत्ये. दोघीही तिकडे बघतात—एकमेकींकडे बघतात, पुन्हा घंटा वाजते. दोघीहि दाराकडे जातात. दार उघडेंच असतें. दार लोटून मोहन येतो. शोधकपणानें दोघींकडे बघतो. तसाच उभा राहतो.]

**मोहन**—श्याम कुठं आहे?

**कला**—आम्ही दोघीहि समजूतदारपणानं वागलों.

**मीरा**—या, बसा इथं! मोहन तुम्हीं श्यामचे वडील आहांत, माझे पति आहांत.

**कला**—आणि माझे प्रियकर आहांत.

**मीरा**—आम्हांला एका बाबतींत तुमचा निर्णय हवा.

**मोहन**—कला, तूं सांगितलंस हिला ?

**मीरा**—पण माझा विश्वास बसत नाहीं.

**मोहन**—कशावर ?

**मीरा**—मला माझ्या श्यामचा आधार घ्यायचा नाहीं. तो आतां घरीं नाहीं. समजा, आतां या घराला आग लागली; आणि तुम्हीं फक्त एकीलाच वांचवूं शकतां; तर तुम्ही कुणाला वांचवाल ?

**कला**—अय्या, रोमँटिक आहेस तूं ताई ?

**मीरा**—आम्हीं दोघीजणी आगीच्या लोळांत सांपडलों आहोत, नी म्हणतो, ' मोहन वाचवा मला ! '

**कला**—( हंसत नाटकीपणानें ) मोहन, वांचवा मला !

**मोहन**—मीरा, किती लावून घेशील जिवाला. संसार म्हणजे एक मोठी तडजोड असते बघ.

**मीरा**—म्हणूनच विचारत्ये मी. सांगा कुणाला वांचवाल तुम्हीं आम्हां दोघीजणींतून !

**कला**—सांगा ना कुणाला वांचवाल तें ?

**मोहन**—( उद्वेगानें ) मीरा, कला, तुमच्या या पोरकटपणामुळं मात्र वाटतं–खरंच या घराला आग लावून टाकावी, तुम्हां दोघीनाहि आंत कोंडून ठेवावं नी दूर निघून जावं. स्त्रियांना संसार आणि पुरुषावरचा हक्क यांच्याशिवाय दुसरं कांहींच कसं सुचत नाहीं, याचंच मला नवल वाटतं–आणि तुम्हां स्त्रियांना म्हणे देवता म्हणायचं. शुद्ध जळवा आहांत !

**कला**—( गंभीरपणानें ) मोहन, मीराताईच्या प्रश्नाचं 'उत्तर द्यायची टाळाटाळ नाहीं करूं देणार मी !

**मीरा**—या प्रश्नाच्या उत्तरावरच मीरेचं अस्तित्व अवलंबून आहे.

**मोहन**—( वैतागून ) आणि माझ्या अस्तित्वाचं काय ? माझा तुम्हीं दोघीनीं कांहीं विचार तरी केलेला आहे कां ?

**कला**—या प्रश्नाचं उत्तर तुम्हांला दिलंच पाहिजे. मोहन, या प्रश्नाच्या उत्तरावरच कलेचं भवितव्य अवलंबून आहे.

**मोहन**—या प्रश्नाच्या उत्तरावर समाजाचं काय भवितव्य अवलंबून आहे ? आज जग युद्धाच्या खाईत पडलेलं आहे. तिकडे भयंकर संहार होतो. इकडे उपासमार चाललेली आहे, साम्राज्यांचे संसार कोसळून पडलेले आहेत. अनेक राष्ट्रांचं अस्तित्वच मुळीं नष्टप्राय झालेलं आहे. लक्षावधि स्त्रियांचे पती रणांगणावर लढत आहेत, लक्षावधि स्त्रिया घरसंसाराचा मोह सोडून एका नव्या जगाच्या घडवणूकीसाठीं झटत आहेत.

**कला**—अग्रलेख बडबडूं नका मोहन ! युद्धं होतात मालकी हक्कासाठीं, अधिकारासाठीं ! जिंकेल त्यानं भोगावं, हरेल त्यानं रडावं. जिव्हाळ्याचे प्रश्न अनेक असतील, पण आम्हां दोघींच्या जिव्हाळ्याचा प्रश्न एकच आहे—एकच आहे.

**मीरा**—तुमच्या त्या नव्या जगांत आम्हां दोघींपैकीं कुणाला न्याल मोहन ? सांगाना ?

**कला**—सांगाना ! या प्रश्नाचं उत्तर तुम्हांला टाळता यायचं नाहीं.

**मोहन**—कसं टाळतां येईल ? आमच्या संसाराचे नेटे घेऊन एक मोडकळीस आलेला हजारों वर्षांचा जुना डोलारा सांवरून धरायचा आहे ना समाजधुरीणांना ? कला या प्रश्नाचं उत्तर तूं मागूं नकोस.

**मीरा**—कला मागणार नसेल, पण मी मागत्ये आहे. मी—मीरा !

**मोहन**—मग तें मला दिलंच पाहिजे ( कलेचा हात धरतो ) चल कला, मला या आगींतून सुटका करूं दे तुझ्या आधीं !

**कला**—( मीराकडे वळत )—आणि मीराताई !

[ मीरा मटकन कोचावर बसत्ये. ]

**मोहन**—चल, घाई कर कला.

**कला**—म्हटलं, ताई, जिंकल्ये मी !

[ मोहन आणि कला जातात. दार उघडेंच असतें.. मीरा उठत्ये. आजाऱ्याप्रमाणें दाराशी जात्ये, दार बंद करत्ये. टेलिफोनवर जात्ये, डायल फिरवते. ]

**मीरा**—आतां कोणता अधिकार आहे मला या घरांत ?



# अंक चौथा

[ **स्थळ**-तिसऱ्या अंकाचेंच, तारीख सातच आहे. घड्याळांत ठणंठण सहाचे ठोके पडतात. मीरा एक साधें पातळ नेसलेली,-एक लहानशी जुनी लोखंडी बॅग सोफ्यावर उघडी पडलेली, दुसऱ्या एका पातळाची घडी करून ती आंत कोंबत्ये. तिच्या कानांत आतां कुड्या नाहींत, हातांत बांगड्या नाहींत,-केंस कसे तरी विस्कटलेले-श्याम बाहेरून धांवत येतो. ]

**श्याम**—आई ग—

**मीरा**—संपलं कां खेळणं-?

**श्याम**—कुठं गेली ग मावशी ? तिनं मला कबूल केलं होतं सिनेमाला न्यायचं ?

**मीरा**—मग नेईल ना ?

**श्याम**—आणि तूं !—

[ टेलिफोनची घंटा वाजत्ये. मीरा टेलिफोन घेत्ये. ]

**मीरा**—हॅलो,-होय मीच.-शांताताई, त्याचं असं आहे-मी हें घर सोडणार आहे. ( निर्धारानें ) होय सोडणार-द्याल ना मला आश्रय ?-( काकुळतीनें ) नाहीं हो सांगता यायचं सारं—

[ मीराचें बोलणें चाललें असतांना श्याम विस्मयानें तिच्याकडे पाहत असतो, हळूं हळूं तिच्याजवळ येतो. तिला चिकटून उभा राहतो. ]

**श्याम**—आई !

[ त्याच्या खांद्यावर डावा हात ठेवून, मीरा फोनवर बोलत असत्ये. ]

**मीरा**—सांगेन मी सारं-वाईट नाहीं वाटत मला-येत्येच मी आतां-हूं-बराय ! ( रिसीव्हर ठेवत्ये, श्यामकडे वळून )-काय म्हटलंस श्याम ?

**श्याम**—तूं कुठं जाणार आहेस ?

**मीरा**—त्या आपल्या शांताताई नाहींत कां ? त्यांच्याकडे जाणार आहे मी रहायला !

**श्याम**—आणि मी ?

**मीरा**—तूं इथंच रहायचं !

**श्याम**—आणि बाबा ?

**मीरा**—तेही इथंच रहातील !

**श्याम**—पण हें कसं ग ?–मला यायचं असलं तर तुझ्या बरोबर ?

**मीरा**—येशील तूं माझ्याबरोबर ?

**श्याम**—पण बाबाच कसं ग ? रागावले ते तुझ्यावर ?

**मीरा**—नाहीं. मी रागावल्ये आहे त्यांच्यावर !

**श्याम**—माझ्यासाठीं सोडणार नाहींस तूं राग ?

**मीरा**—( विचारांत पडली ) तुझ्यासाठीं ?

**श्याम**—( केविलवाणा ) होय, माझ्यासाठीं !

**मीरा**—तूं येणार आहेस ना माझ्याबरोबर ?

**श्याम**—पण मला बाबा पण हवेत !

**मीरा**—पण त्यांना मी नको असल्ये तर ?

**श्याम**—( आशावादी ) मला नाहीं वाटत. बाबांना विचारूं मी ?

[ दारावरची घंटा वाजत्ये. दोघेही दाराकडे पाहतात. पण दार उघडायला कुणीच जात नाहीं. पुन्हां घंटा वाजत्ये. ]

**मीरा**—बघ बरं !

[ श्याम दार उघडतो, कला–तिची मुद्रा गंभीर पण म्लान मलूल, मीरा तिला पाहतांच आंत निघून जात्ये. श्याम कलेचा हात धरून तिला आंत आणतो. ]

**श्याम**—आलीस मावशी ?–मला वाटलं, तूं फसवलंस मला ! आपल्याला सिनेमाला जायचं होतं !

**कला**—जायचं ?–मीराताईला विचारूं नी जाऊं !

**श्याम**—खरंच, जमायचं नाहीं आपलं आज ! आई बाबांवर रुसली, ती हें घर सोडायची तयारी करीत आहे, मी पण तिच्या बरोबर जाणार आहे. बाबा कीनई कधीं कधीं वाईट करतात ग !

**कला**—मीराताई घर सोडून जाणार ? ( हांक मारत्ये )–ताई !

[ आंत जाऊं लागत्ये, मीरा येत्ये व तिचा हात धरत्ये ]

**मीरा**—मी वाटच बघत होत्ये, तुमची कलाताई ?

**कला**—पण मी आल्ये ती—

**मीरा**—तुम्हीं आलांत हें फार फार चांगलं झालं. संसाराचा सगळा सांभाळ सांगून जातां येईल मला आतां ?

**कला**—( विस्मयानें ) सांभाळ ? मोहन कुठं आहेत ?

**मीरा**—त्यांचाहि सांभाळ सांगायचा आहे मला ! कलाताई, तुम्हीं जिंकलात, मी हारल्ये. अभिनंदन करत्ये मी तुमचं.

**कला**—जिंकल्ये ? ताई, एक शब्द बोलूं देणार नाहीं मी तुला ! मघाशी मला कसं एकेरी नांवानं हांक मारीत होतीस ?

**मीरा**—( तिकडे लक्ष न देतां ) कलाताई, हा तुमचा संसार ! साऱ्या वस्तु जागच्या जागीं ठेवलेल्या तुम्हांला आढळतील ! त्या पलीकडच्या कपाटांत साऱ्या हिशोबाच्या वह्या सांपडतील. दागिन्यांच्या पेटीची किल्ली कांचेच्या कपाटांत ठेवलेली आहे. तिथंच कांहीं पंधरा वीस रुपयाच्या नोटा असतील. माझे कपडे तुम्हांला आवडायचे नाहींत, कुणातरी गरजू बाईला द्या ते.

**कला**—( जिकीरीस येऊन ) ताई, हें काय बोलत्येस तूं ?

**मीरा**—पुरतं सांगू द्या मला कलाताई ! मोहनला सांभाळणं जरा अवघड जाईल तुम्हांला, तऱ्हेवाईक संवयी आहेत त्यांच्या ! झोंपेंतून उठल्यावर आधीं पलंगावरच चहा हवा असतो त्यांना, जेवतांना कांदे चालत नाहींत, तिखट नको असतं. मला तुमचा मांसाहार चालत नाहीं, तरी पण त्यांना मासे विशेष आवडतात. त्यांच्यासाठीं सर्व कांहीं शिकल्ये होत्ये मी ! तुम्हीं त्यांत सुग्रण असाल; नोकरांच्या हातचं जेवण त्यांना चालत नाहीं.

**कला**—( निर्धारानें ) थांब मीराताई–( तिचा हात धरत्ये )

**मीरा**—( हात सोडवून घेऊन )–सुदैवानं सारं कांहीं सांगण्याची संधि आणलेली आहे तुम्हीं. सांगून घेऊं द्या मला माझं !–

**कला**—पण ताई, कसं ग–( रडकुंडीला येत्ये )

**मीरा**—गप्प बसा म्हणत्ये ना मी ! तुम्हीं एक जबाबदारी स्वीकारलीत ती पार पाडावी लागेल.–मोहन लिहायला बसतात, तेव्हां त्यांना माणसांचा वारा सहन होत नाहीं. श्यामसुद्धां मग त्यांच्या या खोलीत फिरकत नाहीं. झोंपायच्या आधीं कोको घेण्याची त्यांना संवय आहे.

[ आतांपर्यंत श्याम आळीपाळीनें कला व मीरा यांच्याकडे बघत राहतो. ]

**श्याम**—आणि पुस्तकाचं ग आई ?

**मीरा**—होय, विसरल्येच. त्यांचीं हीं पुस्तकं आवडत नाहीं त्यांना कुणी नेलेली; म्हणतात, " पुस्तकं ही पत्नीप्रमाणं असतात, त्याला परपुरुषांनीं स्पर्श करतां कामा नये. "—नाहीं तर तुम्हीं द्याल एखादेवेळीं त्यांची पुस्तकं कुणाला ?

**कला**—( जिकीरीनें ) ताई, मला बोलूं देशील आतां !

**मीरा**—नाहीं, माझं बोलणं संपलं नाहीं अजून !—या बघा कुडया नी बांगड्या त्यांनीं केल्या होत्या हौसेनं. त्या तुम्हांला आवडायच्या नाहींत, पण माझा आतां त्याच्यावर कांहीं ही हक्क नाहीं. या घरांत मी आल्ये, अगदीं पहिल्यांदा लग्न होऊन आल्ये, तेव्हां ही लहानशी पेटी आणि दोन नवीं लुगडीं होतीं माझ्याजवळ, आज ही माझी माहेरची पेटी आणि हीं दोन जुनेरं घेऊन जात आहे.

**श्याम**—( निर्धारानें ) आई, मी येणार हं तुझ्या बरोबर !

**मीरा**—( शंकेनें ) मला नाहीं वाटत, तुला येतां येईल म्हणून !

**श्याम**—कां बरं ? मी येणार !

**मीरा**—कलाताई, मुलावर बापाचा हक्क ! मुलाला जन्म देतांना आईचा पुनर्जन्म होत असला तरी त्याच्यावर बापाचा हक्क असतो—माझ्या श्यामचा सांभाळ करा.

**श्याम**—मी नाहीं अं, आई ! ( तिला बिलगतो. )

**कला**—( धाडकन कोचावर आंग टाकून ) बोलूं देखील देत नाहींस तूं मला ?

**मीरा**—( श्यामला बाजूला सारून कलेजवळ जात्ये ) आणि एक राहिलंच ! कलाताई, हें माझं सौभाग्यलेणं-( गळयांतलें मंगळसूत्र काढते. इकडे श्याम आंत जातो ) याच्यावर माझा कांहींही हक्क नाहीं—माहेराहून आणलेलं मंगळसूत्र श्यामचे वडील तुरुंगात गेले तेव्हां सावकाराकडे गेलं. गळयांत काळी पोत नी डोरलं होतं. बरे दिवस आल्यावर श्यामच्या वडलांनीं हें मंगळसूत्र मुद्दाम तयार करवून घेतलं होतं—हें माझं नव्हतं, त्यांच्या पत्नीसाठीं होतं तें, याची नीट जतन करा.

[ तिच्या गळयांत मंगळसूत्र घालायला जात्ये, ती ताडकन् उभी राहत्ये. ]

**कला**—मागं सर ताई—पुरे झाला हा छळ ! इथनं गेल्ये तेव्हां वाटलं

जिंकल्ये मी !–पण तो माझा भ्रम ठरला ताई, खरा जय तुझाच झाला. जिंकलीस तूं, हारल्ये मी !

**मीरा**—( विस्मयानें ) तुम्हीं हारलात ? तुम्हीं हारलात !

**कला**—होय, होय, होय ! कसं सांगू मी तुला ? बोलूं दे मला आतां पुरतं ! आणि मला हांक मार पाहूं पहिल्यासारखीच एकेरी नांवानं !

**मीरा**—पण तुम्हीं हारलांत ? मला नाहीं खरं वाटत ?

**कला**—याचं कारण सांगू मी ? पण नको. ताई, सर्वच कडु गोड अनुभव मिळवल्येस तूं आणि शेवटीं जिंकलीस पण तूंच !

[ श्याम आतून आपली बॅग आणि पुस्तकांची पिशवी घेऊन येतो. ]

**श्याम**—आई, मी पण येणार आहे, चलायचं असेल तर चल आतां.

**कला**—सिनेमाला चलायचं होतंना, त्याचं काय ?

**श्याम**—बघेन केंव्हांतरी, आतां नको.

**कला**—पाहिलंस ताई, म्हणूनच म्हणत्ये–तूंच जिंकलंस ! मला वाटलं, मोहन घरीं आले असतील.–त्यानीं सांगितलं असेल तुला सारं–

**श्याम**—बाबा घरीं आले नाहींत.

**मीरा**—काय सांगणार होते ते !

**कला**—मला काय सांगितलं तें सांगत्यें मी !

**मीरा**—पण तुम्हीं कशा आलांत इथं ?

**कला**—( जिकीरीस येऊन ) मला आधीं बोलूं तरी दे–इथून त्यांच्याबरोबर गेल्ये तेंव्हां वाटलं, मोहननं माझी निवड केली.–तुला सांगितलं देखील मी.

**मीरा**—तें बरोबर होतं तुमचं सांगणं–कारण तो तुमचाच जय होता.

**कला**—पण मोहन माझ्याबरोबर आले, वाटेत एक शब्द देखील बोलले नाहींत, मी म्हटलं, समुद्रावर जाऊं या. तर नको म्हणाले.–माझ्या खोलीवर आले, आणि म्हणाले—

[ थांबते–श्यामकडे पाहते. तो उत्कंठतेनें ऐकत असतो. ]

**मीरा**—( लक्षांत येऊन ) श्याम, माझं एक काम करशील !

**श्याम**—कुठलं ग ?

**मीरा**—असं येतात वाटतं बाहेर !–जा न्हाणीघरांत पळ, कपडे बदल.

**श्याम**—मोठ्या माणसांच्या बोलण्यांत मी लक्ष घालतो म्हणून वाटतं !

**कला**—( हंसून ) होय, अस्संच !

**श्याम**—( कुरकुरून ) मग मोठ्या माणसांनीं असं लक्ष घालण्याजोगं वागावं काय म्हणून ? ( आंत जातो )

**मीरा**—काय म्हणाले ते ?–

**कला**—म्हणाले–' मला कळत नाहीं कला, पण मीराला मी सोडूं शकत नाहीं. ''

**मीरा**—असं म्हणाले ते ? आणि मग इथून जातांना मात्र—

**कला**—तेंच विचारलं मी त्यांना—

**मीरा**—तेव्हां काय म्हणाले ?

**कला**—म्हणाले–" मीरा आणि मी आम्हीं आज बारा वर्षं एकमेकांना सोबत केली. तूं आमच्या घरांत नव्यानं शिरूं पाहत होतीस. तुला आधीं वाचवणं हे दयेच्या दृष्टीनं योग्य होतं. "

**मीरा**—दया, दुसरीची दया !

**कला**—नाहीं, पुढं म्हणाले, " आतां आमच्या पेटत्या घरांतून मी आणि मीरा एकमेकांच्या खांद्याला खांदा लावून बाहेर पडूं. जगायचं ते बरोबर, मरायचं ते बरोबर ! "

**मीरा**—अस्सं म्हणाले ते ?

**कला**—( हंसून ) होय असं म्हणाले ! आणखी म्हणाले–" आम्हीं दोघे जन्माचे सोबती आहोत. "

**मीरा**—तूं कांहींच बोलली नाहींस ?

**कला**—( हंसून ) विचारलं ना ?· म्हटलं–नी मी कोण ?

**मीरा**—पुरुषांचं मन कळत नाहीं. काय उत्तर दिलं ?

**कला**—म्हणाले, " कुणी सांगावं कला, हें माझं प्रेम म्हणजे लुसलुशीत मांसावर गेलेली लांडग्याची नजर असेल. मीराचे केस पिकत चालले. "

**मीरा**—( टेबलावरचा आरसा बघत ) पांढरे केस दिसतात दोन चार !

**कला**—आणि काय केलं असेल ताई त्यांनीं ? ओळख बरं !

**मीरा**—नाहीं मला ओळखतां येणार ? कल्पना नव्हती केली मी याची !

**कला**—मला तरी कुठं कल्पना होती ?

**मीरा**—पण कुठं आहेत आतां ते ?

**कला**—लागलीच तिथून गेले. पुन्हां मला घरांत पाऊल ठेऊं नकोस म्हणून बजावून गेले. आतां त्यांची माझी जन्माची ताटातूट झाली ग ताई !

**मीरा**—मग आतां आलीस ती ?—

**कला**—तुझी क्षमा मागायला आल्ये होत्ये. करशील तूं मला क्षमा ?

**मीरा**—झालं गेलं गंगेला मिळालं, पण तुझं काय ?–तुझ्या मुलाचं काय ?

**कला**—( हांसून ) तेंच सांगायला आल्ये मी ! ताई, आधीं वचन दे !

**मीरा**—( कुतूहलानें )–कशाबद्दल ?

**कला**—माझं गुपित मोहनला सांगायचं नाहीं !

**मीरा**—त्यांना माहीत नाहीं हें ?

**कला**—नाहीं, आणि आतां कळावं अशी इच्छा पण नाहीं. ताई, माझ्या मुलासाठीं म्हणून मोहनला बांधून घ्यायचं नाहीं मला ! सांगितलं असतं त्याना तर कदाचित त्यांनीं माझा—

**मीरा**—अजूनही करतील ते तुझा स्वीकार, सांगेन मी त्यांना !

**कला**—( निर्धारानें ) नको, माझ्या मुलाचं मी बघून घेईन. सक्तीनं मोहनला बांधून घ्यायचं नाहीं मला. मला त्याचं प्रेम हवं होतं–दया नको !

**मीरा**—पण उद्यां तुझ्या मुलाचं काय ?

**कला**—उद्याचा विचार आज कशाला ? आई आपल्या बाळांची काळजी घ्यायला समर्थ असत्ये. बापाचं हें बुजगावणं कशाला ?

**मीरा**—( निषेधाने )–कला–

**कला**—( विषण्ण हास्य करून ) रागावलीस ताई ?

[ दारावरची घंटा वाजत्ये. कला दार उघडत्ये, मोहन दिसतो. कलेला पाहून थबकतो. कला मीरेकडे पाहत्ये. ]

**मोहन**—कला, आपलं काय ठरलं होतं ?

**मीरा**—काय ठरलं होतं ?–कला इकडे ये अशी ! ( तिला आपल्या पाठीशी घालत्ये. )

**मोहन**—मीरा, तुझं मला कळतच नाहीं.

**मीरा**—काय कळत नाहीं ? तुम्हां पुरुषांना स्त्रीहृदय कळत नाहीं. तुम्हीं आजपर्यंत केलंत, तें तरी मला कुठं कळलं होतं ? तुम्हीं पुन्हां घरीं परत आलांत, तुम्हांला तुमची बायको मिळाली, मुलगा मिळाला, घरसंसार मिळाला–पण या वेड्या जिवाला काय मिळालं ?

**कला**—( तिच्यापासून दूर सरत ) ताई, क्षमा कर. माझं मी बघून घेईन. सांगू ? मला अनुभव मिळाला, प्रकाश मिळाला, जीवन मिळालं !

[ श्याम येतो. त्याचे केंस विचरलेले आहेत. ]

**श्याम**—आई, चलायचं ना आतां ?

**मोहन**—कुठं रे मोहन ?

**मीरा**—तें त्या दोघांचं गुपित आहे. श्याम नी त्याची कलामावशी यांचं सेनेमाला जायचं ठरलं होतं.

**कला**—माझ्याकडेच झोंपायचं पण !

**श्याम**—बरं, झोपेन !-नाहीं कां ग आई ?

**मीरा**—हूं !

**कला**—ताई, हें मंगळसूत्र असं लोळत ठेवून चालणार नाहीं.

[ तिच्या गळयांत स्वतःच्या हातानें घालत्ये. मीरा तिचे डोळे पुसत्ये. ोहन आंत निघून जातो. ]

**मीरा**—आतां आपण बहिणी बहिणी झालों. तुझा संसार उभारण्यासाठीं ला आतां तुला मदत करावी लागणार !

**कला**—( विषण्णपणाने हांसून ) आतां कसला संसार ! ताई, एका ाबतीत अजून माझा पराभव कबूल करायचा आहे. तुला कल्पना नाहीं ाची, पण त्यांचं तुझ्यावर प्रेम आहे, प्रेम !-श्याम चलायचं ना !-

**श्याम**—जाऊं आई ?

[ मीरा मानेनें खुणावत्ये, श्याम व कला जातात-मोहन बाहेर येतो ]

**मोहन**—कशाला आली होती कला.

**मीरा**—आमचं गुपित आहें तें !

**मोहन**—( काकुळतीनें ) शपथ आहे माझी तुला !

**मीरा**—( हांसून ) एक ओंवी सांगायला आली होती.

**मोहन**—( कुतूहलानें ) कसली ओवी ?

**मीरा**—तुम्हांला काय करायचं त्याच्याशी ?

**मोहन**—मीरा-मीरा-सांग-

**मीरा**—ती म्हणाली-**चंदन, चंदन, चंदन बारा खोडी**

**बायकांची जात वेडी-पुरुषांची माया थोडी.**

**मोहन**—क्षमा कर मीरा, गेल्या चार दिवसांत मनाला किती यातना ाल्या माझ्या !

**मीरा**—आणि माझ्या जीवाला झाल्या असतील त्या ?

**मोहन**—तुला काय वाटलं मी निघून गेल्यावर ?

**मीरा**—कांहींही वाटलं नाहीं.

**मोहन**—खोटं आहे ते ! लक्षांत ठेव मीरा, नवरा बायकोनी एकमेका लपंडाव करून चालणार नाहीं !

**मीरा**—नाहींना ! मग सांगा; इथं परत आल्यावर मी जर तुम्हां-आढळल्ये नसत्ये, तर तुम्हीं काय केलं असतंत ?

**मोहन**—शक्य नव्हतं तुला ते ! श्यामची जबाबदारी होती तुझ्यावर

**मीरा**—आणि तुमच्यावर नव्हती कां ?

**मोहन**—खरं सांगू मीरा, मी आलो तो श्यामसाठीं नव्हे, म तुझ्यावर प्रेम होतं, म्हणून आलों मी परत.

**मीरा**—( हांसून ) पण माझे केंस पांढरे होत चालले, कलेचे केंस—

**मोहन**—वीस वर्षांनीं तिचे देखील केस पांढरे होतील ! श्यामचे देखे होतील पांढरे केंस पन्नास वर्षांनीं !

**मीरा**—पण कलेचं प्रेम आहे तुमच्यावर !

**मोहन**—पण माझं आहे तुझ्यावर–होय–तुझ्यावरच !

**मीरा**—आणखी एक ओंवी सांगितली कलेनं मला !

**मोहन**—कोणती ?

**मीरा**—**चंचळ, चंचळ, चंचळ काय बाई,**
**पुरुष मनाची कधी देऊं नये ग्वाही.**

**मोहन**—मीरा माझं ऐकशील,–छळूं नकोस मला.

**मीरा**—( गोड हंसून ) बर मग ! काय ऐकायचं सांगा तरी !

**मोहन**—आतां तरी हे पलंग एकत्र जुळवायचे ना ?

**मीरा**—पाहूं मग !

**मोहन**—नाहीं, आतांच–आतांच–! अश्रूंच्या अभिषेकानं पवित्र कर मी हें तुझ्या माझ्या प्रीतीचं देवघर !

**मीरा**—श्याम पडायचा नाहीं कांहीं आतां—

**मोहन**—पण मी पडेन–मी पडेन—

[ दोघेहि पलंग एकत्र जुळवूं लागतात.. ]

